# पंचवीस वर्षांनंतर

[ कोणत्याही काळांत रुचावेत असे
तेवीस खेळकर लघुनिबंध ]

डॉ. वि. पां. दांडेकर, एम्. ए., पीएच्. डी.

१९५१




* ५६ *

मूल्य पावणे दोन रुपये

हा माझा पांचवा लघुनिबंधसंग्रह. प्रस्तुत संग्रहांतील लघुनिबंध किर्लोस्कर, नवयुग, मनोहर, सह्याद्रि, स्वदेश, लोकशाही, रागिणी इत्यादि मासिकांत किंवा वार्षिकांत ह्यापूर्वी प्रसिद्ध झाले. त्यांत कांहीं किरकोळ फरकांवांचून दुसरी कोणतीही सुधारणा मी केलेली नाहीं.

वि. पां. दांडेकर

बडोदें, जून १९४९

नांवाची सार्थकता पटविण्यासाठीच कीं काय, ह्या पुस्तकातले कांही लेख योजले गेल्यानंतर फार वर्षांनी पुस्तकरूपाने प्रसिद्ध होत आहेत. त्यामुळें त्याचे विषय 'टाईम-बार' झाल्यासारखे वाटले तरी त्यातील साहित्याचें रसग्रहण एवढ्या कालान्तरानें सुद्धा होऊं शकेल अशी खात्री वाटते. लेखकानेंच सुचविल्याप्रमाणें पंचवीस वर्षांनंतर एखाद्या स्थळाचें स्वरूप सुतराम् पालटून गेलें तरी सागरासारखी कांहीं शाश्वत सत्यें व सौंदर्यें अशी असतात कीं काळाचा परिणाम त्याच्यावर होऊं शकत नाहीं. जीवनातील सत्य आणि सौंदर्य ह्यांचें दर्शन कालगति बंद करूं शकत नाही. तें घडवून घेण्याइतका उल्हास आपल्यात असला म्हणजे झालें.

तो उल्हास आणि खेळकरपणा हेंच तर दाडेकराच्या लघुनिबंधाचें वैशिष्ट्य आहे !

प्रकाशक

# अनुक्रमणिका

# पंचवीस वर्षांनंतर

तुम्ही खूप खूप वर्षांनीं एखाद्या ठिकाणीं गेला आहांत काय? गेलां असल्यास मी आतां सांगणार आहें तसला किंवा तशा स्वरूपाचा अनुभव तुम्हाला खाचित आला असेल. वाटेल त्या स्थळाच्या ठिकाणीं मी सांगणार आहे तसला अनुभव तुम्हाला येणार नाही. दिल्ली, आग्रा, काश्मीर इत्यादि ठिकाणी एकदा जाऊन नंतर काही वर्षांनीं पुन्हा त्या स्थळीं तुम्ही गेल्यास तुम्हाला जरूर काही फरक आढळेल. तसल्या फरकाविषयी मला येथें कांहींही लिहायचे नाहीं. जेथें तुम्हीं आपले बालपण घालविलें आहे, ज्या परिसरांत तुम्ही बाललीला ( ज्याला प्राकृत भाषेंत माकडचेष्टा म्हणतात ) केल्या आहेत, जेथील वस्तुमात्राशी तुमचा जिव्हाळ्याचा सबंध आहे, अशा स्थळाविषयीं मी बोलत आहें. अशा ठिकाणीं जर अनेक वर्षांनी तुम्ही गेलांत तर तुमच्या मनाची कांहीं विलक्षण नाजूक स्थिति होईल. निदान माझी तरी तशी स्थिति झाली.

परवाच्या दिवशी पंचवीस वर्षांनी म्हणजे पुरत्या पाव शतकानंतर मी बलसाड येथे जाऊन आलो. एवढ्या दीर्घ कालावधीत त्या गांवाविषयीं आणि तेथील ग्रामवासीयाविषयी अधूनमधून मला जी ऐकून माहिती मिळे तेवढीच. बडोदे ते मुंबई ह्या वाटेवर हें गांव असून परवांपर्यंत मी तेथें न गेल्यानें माझ्या मनाची कांही विलक्षण स्थिति झाली होती. त्या गांवाविषयीं माझ्या मनाला एकीकडे चमत्कारिक ओढ लागली होती, तर दुसरीकडे पुष्कळ वर्षे मध्यंतरी गेल्यानें ते गाव मला दुरावल्यासारखें झाले होतें. एक प्रकारचा तुटकपणा, परकेपणा आमच्यांत निर्माण झाला होता. माझें बालपण मी तेथें घालविल्यानें मुंबईस जाताना आणि मुंबईहून परत येतांना बलसाड स्टेशन येताच माझ्या अंतःकरणांत कांहीं विलक्षण कालवाकालव होई. 'आता आपणाला कोण तेथें ओळखणार ? ओळखीच्या गांवी आपण अनोळख्या-सारखें वागणार !' अशा प्रकारची मी माझ्या मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न करीं. हा प्रयत्न यशस्वी होऊन बलसाड आणि मी ह्यांतील कालाचा

पडदा अधिकाधिक चिवट आणि घट्ट बनूं लागला. परंतु परवाच्या दिवशीं काय झालें कुणाला ठाऊक, नेहमीप्रमाणेच मुंबईस जातांना मध्यरात्रीच्या सुमारास बलसाड आले. आणि माझ्या मनाने एकदम निश्चय केला, की आता मुंबईहून परत येताना येथे उतरल्यावाचून बडोद्यास कांही जायचें नाही. ह्या निश्चयाला थोडेसे निमित्त झालें ह्यात शंका नाही. डब्यातील उतारू बलसाडचे वर्णन करूं लागले आणि बलसाड येतांच ते खालीं उतरले. ह्याच्या पूर्वीं ही अशी वर्णनें मी ऐकली होतीं; पण त्याचा माझ्या मनावर काहीच परिणाम झाला नव्हता. ह्या खेपेस मात्र उतारूंच्या बोलण्याचा परिणाम माझ्या बलसाडविषयीच्या विरहाकुल मनावर होऊन वर लिहिल्याप्रमाणें परत येताना तेथें उतरण्याचे मीं ठरविलें.

आणि मग आणखी दोन दिवसानी आमची स्वारी बलसाडच्या स्टेशनावर पदार्पण करती झाली. माझ्या स्वागताकरिता स्टेशनावर स्वयंसेवकाच्या पथका-ऐवजी साध्या हमालाचें पथक उभे असलेलें पाहून माझा जीव थोडासा हिरमुसल्यासारखा झाला. तरी पण मनाचा हिय्या करून मी स्टेशनावर पाय टेकले. एखादे वेळी मनुष्याच्या मनोभावना अकारण किती हळुवार बनतात त्याचा अनुभव त्या वेळीं मला आला. खूप वर्षांनी आपण ह्या भूमीचें दर्शन घेतों आहोंत ह्यात तिचा अपमान तर होत नाहीं ना, ह्या कल्पनेने ‘ पादस्पर्शं क्षमस्व मे ’ असे मनातल्या मनांत त्या भूमीला उद्देशून मी म्हणालों ! मला काहींतरी चुकल्यासारखें, अवघडल्यासारखें वाटत होतें. पूर्वी मला एकदा असा अनुभव आला होता; पण तो वेगळ्या ठिकाणी व वेगळ्या कारणानें. मागें एकदा माझ्या मैत्रिणीशीं भांडल्यामुळें मी खूप दिवस तिच्याकडे गेलों नव्हतों. पुढें भांडण मिटल्यावर तिच्या घरीं प्रथम जातांच मला खूप अव-घडल्यासारखें वाटले. नेमकी हीच भावना बलसाडच्या भूमीवर पाय ठेवतांच माझ्या ठिकाणी निर्माण झाली. मीं माझ्यासभोवतीं पाहिलें. पारनेऱ्याचा डोंगर व किल्ला माझ्याकडे पूर्वीच्याच प्रेमळ नजरेनें बघत होता. औरंगा नदीचा प्रवाह पूर्वीच्या संथपणानें वाहत होता. स्टेशनजवळील तळ्यांतील लाल कमळें पूर्वीच्याच दिमाखाने सूर्याकडे पाहून हसत होती. ह्या सर्व जुन्या खाणाखुणांनीं माझ्या मनाला धीर दिला आणि मीं नगर प्रवेश करायचें ठरविलें.

गांवाच्या वेशीजवळ सुवासिनींनीं पंचारती घेऊन मला ओवाळणें किंवा गावकऱ्यानीं माझ्या सन्मानार्थ गुढ्यातोरणें उभारून मला सामोरें येणें ह्याची जरी कालमानाप्रमाणें मी अपेक्षा केली नसली तरी वाटेनें जातांना पुष्कळजण आपणाला भेटतील आणि "काय, कसं काय दाडेकर? केव्हां आलात? किती वर्षांनी भेटलात! मेजवानीला आमच्याकडे आलंच पाहिजे; निदान चहाला तरी आलंच पाहिजे..." असें म्हणून आपली वास्तपुस्त करतील ह्याची अपेक्षा मीं खचित केली होती. मोठ्या आशाळभूतपणानें मी रस्त्यातील लोकाकडे आणि घराकडे बघत होतों. पण मला ओळखणारें कोणीही आढळले नाही. रस्ते, रस्त्याचीं वळणे, रस्त्यांतील घरें हीं सर्व माझ्या परिचयाची असून माझा परिचय मात्र कुणालाच पटत नसल्याचें पाहून मला वाईट वाटलें. गेल्या पंचवीस वर्षात सबंध एक नवी पिढी निर्माण होऊन तिचाच किलबिलाट माझ्यासभोवती सुरू होता. जिकडे तिकडे नवे नवे चेहेरे मला दिसत होते. ह्या हुच्च लोकाना आपली कदर नसली तरी जुन्या पिढींतील लोक आपणाला ओळखतील आणि प्रेमानें चार शब्द आपल्याशीं बोलतील अशा विचाराने त्याची चौकशी मी केली. तोंच माझ्या बालपणीच्या परिचयाचे एक पारशी सद्‌ग्रहस्थ अजून हयात आहेत अशी बातमी मला मिळाली. त्या बातमीनें मला जरा हुरूप आला आणि त्याच्याकडे जाण्याचें मीं ठरविलें. गावाच्या दुसऱ्या टोकाला बंदरावर ते राहात होते. त्यामुळें त्यांच्याकडे जातांना गावातला बराच भाग मला पुन्हा पाहायला मिळाला. तो पाहून माझी निराशा झाली. जुनी घरें अधिकच जुनी व जीर्ण दिसत होती. त्या घराच्या ठिकाणीं औदासीन्य पसरलेलें होते. पंचवीस वर्षांच्या पुरणीनें रस्ते उंचावले होते आणि घराचे चौथरे त्या मानानें खालीं गेले होते. माझ्या लहानपणच्या कल्पनेच्या मानानें गाव लहान झाल्यासारखे दिसत होतें. आणि त्या पारशी सद्‌ग्रहस्थांचें घर खूप चालल्यानंतर येईल असें जें मला वाटत होते त्याऐवजी तें लवकर आलें असें मला भासलें.

पारशी ग्रहस्थाचें नाव बरजोरजी शेठ होतें. त्यांच्या घराजवळ पोचतांच मीं त्याच्या नांवानें एकदोन हाका मारल्या तोंच एक आठ दहा वर्षांची काळी-सावळी दुबळ्या जातीची मुलगी माझ्यासमोर येऊन उभी राहिली. मीं तिला

शेठजींना भेटायचें आहे असें म्हणतांच ती मला घरांत घेऊन गेली. घरात कोणी दिसत नव्हतें. फक्त गळ्यांत एक घंटा अडकवलेले गायीचें पारडूं इतस्ततः फिरत होतें. आम्ही आंतल्या दालनांत गेलो. तेथें एका प्रशस्त पलंगावर बरजोरजी शेठ झोपले होते. त्यांचा जराजर्जर देह अगदी क्षीण झालेला दिसत होता. मीं त्यांना अभिवादन केलें आणि 'कोण कोठुनी' आलों ते सर्व समजावून सांगितलें. प्रथम त्यांनीं मला मुळीच ओळखलें नाही. पण हळुहळू त्यांची स्मृति जागृत होऊन त्याच्या नजरेंत एक प्रकारचें तेज चमकूं लागलें. ते मला म्हणाले, "आता तुला मी पुरता ओळखला. तूं भेटायला आलास, फार चांगलं केलंस. माझी मनीषा पुरी झाली. इतकी वर्षे तूं कुठें असशील ह्याचा मी विचार करीत होतों. तुझा फोटो दाखवतों तुला."

असें म्हणत ते वृद्ध गृहस्थ कापत कांपत उठले व एक जुना फोटो त्यांनीं माझ्या हातात आणून दिला. तो एक ग्रूप-फोटो होता आणि त्यात जमिनीवर बसलेल्या मुलाच्या रांगेत माझा काटकुळा देह मला दिसला. बरजोरजी शेठनीं खात्री दिली नसती तर मला माझा फोटो काही ओळखूं आला नसता!

त्या फोटोकडे व माझ्याकडे पाहात ते म्हणाले, "केवढा धिप्पाड झाला आहेस रे तूं! असाच तुझा उत्कर्ष होवो!"

"म्हणजे मी आणखी लठ्ठ होवो?" मी मध्येंच हसत म्हणालों.

"तसं नाही रे. चागल्या अर्थानें तुझा उत्कर्ष व्हावा असं मी इच्छितों. माझा आशीर्वाद आहे तुला."

त्यांच्या बोलण्यानें बरें वाटलें मला. पण बाकीचें गांव मला बघायचें असल्यानें मीं त्यांचा निरोप घेतला. त्यांनी मला राहाण्याचा आग्रह केला; पण कांहीं तरी सबब सांगून त्याची समजूत घातली. शेवटीं त्यांनी दिलेलें गायीचें दूध प्राशन करून व पुन्हा एकवार त्यांना नमस्कार करून मी गांवाच्या दुसऱ्या भागाकडे वळलों.

कांहीं वेळानें मी एका मोठ्या घरासमोर येऊन उभा राहिलों. लहानपणीं कैक वेळां त्या घरी मी गेलों होतो. त्या घरातील वृद्ध बाईची माझ्याबद्दल

फार सहानुभूति होती. ओस्र्याच्या पायऱ्या चढून मीं त्या बाईविषयीं चौकशी करतांच मला असें समजलें, कीं तीन वर्षांपूर्वी वयाच्या नव्याण्णवाव्या वर्षी त्या बाई स्वर्गवासी झाल्या! ह्यानंतर त्यांच्या मुलांची वाताहत होऊन त्याचें घर सध्याच्या मालकाला विकलें गेलें! 'मृताच्या आत्म्याला ईश्वर शांति देवो' असें काहींसें पुटपुटत मी ओस्र्याच्या पायऱ्या उतरून समुद्राच्या दिशेकडे वळलों.

गांवाचा हा भाग मला आकर्षक वाटला. रस्त्याच्या दुतर्फा अगदी समुद्रापर्यंत अद्यतन पद्धतीचे बंगले बांधलेले दिसत होते. त्याच्या ठिकाणी एक प्रकारची प्रसन्नता वाटत होती. बंगल्यासमोरील बागेंत फुले उमलली होती आणि फुलांच्या सभोंवार हिरवळीवर लहान मुलें खेळत होती. जरा पुढे गेलों तों एक विस्तीर्ण क्रीडांगण आढळलें. त्यात मोठालीं मुलें क्रिकेट खेळण्यात दंग झालेली दिसलीं. जुनें बलसाड आणि नवें बलसाड ह्यात अशा तऱ्हेने जमीन-अस्मानाचा फरक होता. जुनें बलसाड क्षीण होऊन मरणाची वाट चालत असल्या-सारखें दिसत होतें, तर नवें बलसाड बालकाच्या निर्व्याज आनंदाने थय्‌थय् नाचत असल्यासारखें दिसत होतें. जुन्या गावात घाण होती, लहान रस्ते होते, विद्रूप घरें होतीं; नव्या गांवात स्वच्छता होती, रुंद रस्ते होते, सुंदर घरें होती. केशवसुतांची 'जुनें जाउंद्या मरणालागुनि' ही ओळ मला आठवली. आणि ज्या गांवात मी लहानपण काढलें त्याच गांवाला उद्देशून एखाद्या कृत-घ्नाप्रमाणें मी 'जुनें जाउंद्या मरणालागुनि' असें बिनदिक्कत मनातल्या मनांत म्हणालों.

इतक्यात जवळच्या बंगल्यातून रेडिओचा आवाज ऐकूं येऊं लागला. पुन्हा एकदा मला माझ्या लहानपणाची आठवण झाली. त्या वेळी पहिलें जागतिक युद्ध सुरू होतें. बरजोरजी शेठ आमच्या घरी रात्री येत आणि दिव्याच्याभोवतीं सर्वजण बसून वर्तमानपत्रांत येणाऱ्या युद्धवार्ता वाचीत आणि नकाशांत जर्मन कुठवर आले तें बघत. त्या मानानें आतां युद्धसाधनांत आणि युद्धतंत्रांत कितीतरी फरक झाला आहे! तेव्हां विमानें आणि रेडिओ नव्हते. सध्याच्या युद्धांतील विद्युत्-तंत्र आणि सांडस-व्यूह नव्हते. आतां ताशी चारशें मैलांच्या वेगानें विमानें उडतात आणि क्षणार्धांत जगाच्या एका टोकाची

बातमी दुसऱ्या टोकाला समजते. गुप्त बातमीचें तंत्र आतां अगदींच निकामें झालें आहे. कुठून तरी खरी बातमी मिळण्याचा संभव वाढल्यानें खोट्या बातम्याचें प्रमाण अगदीं कमी झालें आहे. त्या काळीं युद्धवार्ता फार थोड्या समजत; पण त्या जाणून घेण्याची अधीरता हल्लींच्या मानानें तेव्हां अधिक होती. जर्मनाच्या जयात आनंद मानणारे हल्लीप्रमाणें तेव्हाही लोक होते. केवळ संख्येचा विचार केल्यास तेव्हा थोडे जास्त लोक असतील. जर्मनाच्या अपयशात कामगारवर्गाचे कल्याण आहे असें मानणारा प्रबुद्ध वाचक त्या वेळी आढळला नसता. पूर्वीच्या मानानें ही प्रगतिच म्हणायची. स्वतंत्रपणें विचार करणाऱ्याची संख्या, मला वाटतें, वाढूं लागली आहे.

चालत चालत समुद्राच्या मी जवळ जाऊं लागल्याने समुद्राच्या लाटाचा आवाज माझ्या कानावर येऊन आदळूं लागला. वाऱ्यांतील ओलसर दमटपणा वाढला आणि थोड्याच वेळात सागराचें विराट स्वरूप माझ्यासमोर दिसूं लागले. भरतीची वेळ असल्याने लाटावर लाटा येऊन किनाऱ्यावर आदळत होत्या आणि लाटाचे फेसाळ पाणी नागमोडी वळणाने किनाऱ्याला गुदगुल्या करीत पुढेमागें जात होते. बलसाड गावात होणाऱ्या फरकाकडे ह्या सागराचें मुळीच लक्ष नव्हतें. आणि तें कोणत्या शहरांतील होणाऱ्या फरकाकडे असते म्हणा ! स्वतःच्या देहावर उसळणाऱ्या क्षणभंगुर लाटाइतकेच महत्त्व जगातील हालचालींना सागर कदाचित् देत असावा !

फार उच्च अर्थानें जगाची प्रगति होते आहे कीं अधोगति होते आहे ह्याविषयी पुष्कळ तत्त्वचिंतकाना भ्रांति पडली आहे. जगात फक्त हालचाल आढळते आहे. ही हालचाल बरी की वाईट ह्याविषयी आपण खात्री देऊं शकत नाही असे ते म्हणतात. ह्या तत्त्वचिंतकाची वृत्ति माझ्यासमोर 'तटस्थ' पसरलेल्या सागराप्रमाणेंच असते. जगात ते मिसळत नाहीत, जगाशीं समरस होत नाहीत. त्यामुळे जगाची प्रगति त्याना दिसत नाही. ते 'आत्मसंतुष्ट' असल्यानें जगाच्या संतोषाची त्यांना पर्वा नसते. पण तुमच्याआमच्यासारखे लोक जगात जे वावरत आहेत ते खचित असें म्हणतील, की जगाची प्रगतिच होते आहे. जग अधिकाधिक जवळ येतें आहे. जागतिक बंधुभाव वाढण्याचीं सर्व सुचिन्हें दिसताहेत. राजाकरितां नाही, धर्माकरितां नाहीं, पैशाकरितां नाहीं,

तर विशिष्ट तत्त्वप्रणालीकरितां जागतिक युद्धें खेळली जाण्याइतकी आज जगाची प्रगति झाली आहे. ह्या परिस्थितींतूनच सामान्य माणसाचें– सामान्य कामगाराचें–नुसतें स्वराज्यच नाहीं, तर महाराज्य निर्माण होईल.

अशाच तऱ्हेने मी आणखीही विचार करीत राहिलों असतो. पण संध्याकाळ होऊं लागली होती. मला परत स्टेशनावर जाऊन गाडी साधायची होती. म्हणून सागराचा निरोप घेऊन मी परत फिरूं लागलों. पुन्हा एकदा मला पूर्वीची आठवण झाली. दर शनिवारी ह्या समुद्रावर फिरायला जाण्याचा माझा क्रम असे. आज इतक्या वर्षांनीं त्या समुद्राचे दर्शन झाल्यानें मनाला प्रसन्न-प्रसन्न वाटले. गावातील मंडळींनीं माझ्याकडे उपेक्षेनें बघितले तरी हा सागर हर्षभरानें नेहमीच आपल्याकडे पाहात राहील ह्या जाणिवेने मला बरें वाटून माझीं पावलें जोरानें स्टेशनाची वाट चालूं लागली.

# सर, सारं आभाळ फाटलंय् !

" सर, सारं आभाळ फाटलंय् आणि तुम्ही मलमपट्टया लावायला सागताय् ! " माझा एक विद्यार्थी एका चर्चेच्या प्रसंगीं म्हणाला.

त्याचें उत्तर ऐकून मी आनंदित झालों, चकित झालों, स्तंभित झालों. एरवीं शात, गरीब, विनयशील, अबोल असणाऱ्या त्या विद्यार्थ्यानें जळजळीत वाटणारे उत्तर दिलेलें ऐकून बरेच दिवस शात राहून जळजळीत अग्निरस बाहेर ओकणाऱ्या ज्वालामुखीची आठवण मला ताबडतोब झाली. त्या तडफदार तरुणाविषयीं मला अभिमान वाटूं लागला. तो माझा विद्यार्थी आहे हें पाहून मला धन्यता वाटली.

प्रसंग असा होता. संकटात सापडलेल्या, दारिद्र्याने पीडलेल्या, आप्तेष्टानीं लाथाडलेल्या अशा एका कुटुंबाचा इतिहास सांगून, विद्यार्थ्यांपैकीं कोणाला काही मदत करता आल्यास त्याने किंवा तिने ती त्या अभागी कुटुंबाला करावी असें मी सागत होतो. मी सांगितलेली हकीगत मुलें शांतपणे ऐकत होती. हकीगत सागून संपल्यावर एकदोन विद्यार्थ्यांनीं आपण होऊन काहीं मदत करण्याचे कबूल केले आणि मग प्रथम उल्लेखिलेला तरुण एकदम उठून उभा राहिला. मला वाटलें– तो काही मदत जाहीर करतो आहे. पण तसें काहीं न करता तो म्हणाला, " सर, सारं आभाळ फाटलंय्, आणि तुम्ही मलमपट्टया लावायला सागताय् ! "

त्याचें उत्तर ऐकून जो काही मानसिक धक्का बसला तो जिरवून उल्ह-सित वृत्तीनें मी म्हणालों, " तुमचं उत्तर नावीन्यपूर्ण आहे. पण त्याचं अधिक स्पष्टीकरण कराल काय ? "

" सर, सोप्या गोष्टींचं काय स्पष्टीकरण करणार ? तुमच्या ह्या मलम-पट्टयांनी कांहींही व्हायचं नाही. तुम्ही एका कुटुंबाला मदत कराल, दोन कुटुंबांना मदत कराल; पण तेवढ्यानें काय होणार ? हजारों कुटुंबं अशीं आहेत, कीं ज्यांना बाहेर उघडपणानें भीक मागतां येत नाहीं आणि ज्यांच्या घरांत

मात्र हंडीशीं हंडी भांडत असते! घरांत फाटक्या साड्या वापरून पण बाहेर आळीपाळीनें एकच चांगली साडी नेसून जाणाऱ्या खोट्या खानदानीच्या स्त्रियांचीं कुटुंबं मला माहीत आहेत. जवळ जवळ उपाशीं राहातात असलीं कुटुंबं. त्यांच्या मुलांना नेसायला नसतात कपडे, कीं वाचायला नसतात पुस्तकं, कीं शाळेंत जायला नसतात पैसे! बाहेर ह्या गोष्टींचा सभ्यतेच्या खोट्या कल्पनांमुळें गवगवा होत नाहीं आणि त्यामुळें 'सब खैरियत' आहे असं आपणाला वाटतं. पण अगदीं असह्य असते त्याची परिस्थिति. वाजवीपेक्षां जास्त तर बोलत नाहीं ना मी, सर?" बोलणें मध्येंच थांबवीत त्या वैशिष्ट्य-पूर्ण विद्यार्थ्यानें विचारलें.

"छे! छे! मुळींच नाहीं. तुम्ही सांगाल तें ऐकायला मी अगदीं उत्सुक आहें." त्याला आश्वासन देत मी म्हणालों.

"काय सांगणार सर? इतके दिवस स्वाभिमानामुळें सांगितलं नाहीं. पण आज विषय निघाला म्हणून सांगतों...मी स्वतःच अशा एका कुटुंबापैकीं आहें."

आणि असें म्हणून डोळ्यांत जमा होऊं पाहाणारे अश्रु प्रयत्नानें दाबून ठेवीत तो उमदा तरुण पुढें काहींही न बोलतां एकदम खालींच बसला. त्याच्या त्या बोलण्याचा आणि एकदम खालीं बसण्याचा माझ्याप्रमाणें इतर विद्यार्थ्यांवरही परिणाम झाला. सारा वर्ग स्तब्ध झाला. त्या स्तब्धतेचा भंग करण्याच्या उद्देशानें मी म्हणालों, "तुम्हांला खाजगी आणि पवित्र वाटणाऱ्या गोष्टींचा उल्लेख माझ्यामुळें तुम्हांला करावा लागला ह्याबद्दल मला वाईट वाटतं. तुम्ही म्हणतां तसली परिस्थिति आहे ह्यांत शंकाच नाहीं. अगदीं हृदय पिळवटून टाकणारी परिस्थिति ह्या देशाची, आपल्या समाजाची आहे. म्हणून तर यथा-शक्ति प्रत्येकानें गरिबांना मदत करावी असं मी म्हणत असतों."

"पण ह्या झाल्या मलमपट्ट्या. त्यांनीं समाजाच्या हृदयाला झालेली जखम कशी भरून येणार? फाटलेलं आभाळ कसं सांधणार?" परिस्थितीनें तत्त्वज्ञ बनविलेल्या त्या विद्यार्थ्यानें पुन्हा उसळी घेऊन मला प्रश्न टाकला.

त्यावर मी म्हणालों, "मग आतां ह्याच्यांतून मार्ग तरी कसा निघणार? तुम्ही काय तोड सुचवतां?"

" तोड? तोड एकच आहे. आहे ही परिस्थिति तोडून मोडून टाकली पाहिजे. समाजाची घटना आमूलाग्र बदलली पाहिजे. आपला व्यक्तिविकास पूर्णपणें करून घेतां येईल अशी सुस्थिति प्रत्येकाला–दान म्हणून नव्हे–हक्कानें मिळाली पाहिजे. एक जबरदस्त मोठ्या प्रमाणावर क्रांति झाली पाहिजे. एकाच क्षेत्रांत नव्हे...सर्व क्षेत्रांत. सामाजिक, धार्मिक, राजकीय, शिक्षणविषयक...सर्वच क्षेत्रांत कुचंबणा झाली आहे. सर्व प्रकारच्या सांचलेल्या पाण्याचे साठे पार घुसळून त्यांतून पाट काढले पाहिजेत. मिरासदारी, भांडवलदारी एकदम गाडली गेली पाहिजे. तरच ह्या देशाचा तरणोपाय आहे. "

" पण तोंपर्यंत तरी मलमपट्ट्या लावल्या पाहिजेतच ना ? " त्या बुद्धिमान् विद्यार्थ्याकडून आणखी काही जाणून घेण्याच्या उद्देशानें मी म्हणालो.

" छे ! छे ! छे ! मलमपट्ट्या मुळींच कामाच्या नाहीत. जखमा उघड्या ठेवून बऱ्या करण्याची वैद्यकशास्त्रात नवीन प्रथा सुरू झाली आहे. मलमपट्ट्यांनी तुम्ही लोकाना पराधीन, अल्पसंतुष्ट, दैवाधीन बनवतां. तुमच्या परोपकारानें तुम्ही लोकांचा आवेश नष्ट करता. लोक रागावले पाहिजेत, चिडले पाहिजेत, संतापले पाहिजेत. तरच त्याच्या हातून महत्कार्य होऊं शकेल. तुमच्या मदतीनें तुम्ही लोकाना पागळे बनवता, मिंधे गुलाम बनवितां. काय हक्क आहे तुम्हांला असं करण्याचा ? पुन्हा विचारतों, काय हक्क आहे तुम्हांला त्यांना मिंधे बनविण्याचा ? "

माझ्या त्या अक्षरशः अद्वितीय विद्यार्थ्यानें टाकलेल्या त्या विलक्षण प्रश्नाचें उत्तर अजूनही मला सांपडलेलें नाहीं !

# नवें जग

ते थंडीचे दिवस होते आणि ती तिसऱ्या प्रहरची वेळ होती. माझा जो कांहीं वाचन-लेखनाचा व्यवसाय आहे तो उरकून, शीड तुटलेल्या तारवाप्रमाणे मोकाट मनाचा मी, माझ्या घरच्या गच्चीवर अर्धवट सावलींत आणि अर्धवट उन्हांत असा आकाशाकडे पाहात पडून राहिलों होतों. माझ्या सुखद मनःस्थितीची तुलना एखाद्या बादशहाच्या मनःस्थितीशीं करण्याचा मोह नवख्या लेखकाला झाला तरी मला ती तुलना योग्य वाटत नाहीं. माझ्याइतका सुखी कोणताही बादशहा असणें शक्य नाहीं. रेल्वेच्या फलाटा-वरील किंवा गोदींत काम करणारे मजूर एक वेळचें काम उरकून दुसऱ्या वेळचें काम सुरू करण्यापूर्वी मधल्या वेळांत ज्या सुखद मनःस्थितींत जमिनीवर उताणे-आडवे-तिडवे पडून एकमकोंशीं गप्पागोष्टी करतात त्या मनःस्थितीशीच माझ्या मनःस्थितीची तुलना करता येईल. खडबडीत जमिनीवर पडून राहाण्यात त्याना जो आनंद होतो तो गादीवर लोळणाऱ्या बादशहाला सुतराम् होणें शक्य नाही.

वर अफाट पसरलेलें गर्द निळें आकाश, त्यांत उडत असलेले कांहीं पतंग, त्या पतंगांशी स्पर्धा करणाऱ्या घारी आणि खालीं गच्चीवर पसरलेला मी. त्या वेळीं मी इतका सुखी व संतुष्ट होतों, की दुसरें कोणतेंही सुख हात जोडून माझ्यासमोर आलें असतें तर त्याला मीं ' नो व्हेकन्सी '–जागा नाहीं–असें म्हणून परत लावलें असतें. थंडीच्या दिवसांत–डिसेंबर-जानेवारी महिन्यात-आपल्या देशात निळ्या आकाशाची अगदीं मेजवानीच पाहाणाऱ्यासमोर ठेवलेली असते. निळ्या रंगाच्या तुडुंब भरलेल्या खोल सरोवराप्रमाणें आकाश दिसत असतें. येथील महाराणी हायस्कूलच्या माजी प्रिन्सिपॉल मिस् नीडहॅम आपल्या ह्या निळ्या आकाशावर निहायत खूष असत. त्या म्हणत, " हें आकाश पाहिलं कीं मला इंग्लंडच्या आकाशाची आठवण होते. "

निळ्या आकाशावरून माझी नजर त्यांत विहार करणाऱ्या पतंगांकडे गेली. ' उंच उंच रे पतंग, घेइ तूं भरारी ' ह्या राजकवि यशवंतांच्या

ओळीची मला सहजच आठवण झाली. यशवंतांनीं आपल्या कवितेंत अगदीं वेगळी भूमिका घेतली आहे. पण आकाशांतील पतंगाकडे पाहून नकळत त्यांच्या ओळीची मला स्मृति झाली. आपापल्या गच्च्यावरून किंवा छपरां-वरून किंवा रस्त्यांवरून मुलें पतंग उडवीत होतीं. अगदीं आनंदानें, चुरशीनें उडवीत होतीं. कांहीं पतंगांचे पेचही लागले होते. आणि ' काटी है, काटी है 'च्या आरोळ्यांनीं वातावरण गजबजून गेलें होतें. पतंग उडत नसून आपण उडतों आहोंत, पतंग डोलत नसून आपण डोलतों आहोंत, पतंग ओढ घेत नसून आपण ओढ घेत आहोंत, पतंगाचा पेच लागला नसून आपला पेच लागला आहे, पतंग कटवला नसून आपण कटवले गेलों आहोंत–अशा तन्मयतेनें त्याचें पतंग उडवणें चाललें होतें.

आणि तें साहजिकच होतें. मनुष्याला एक प्रकारच्या मोकळेपणाची आवश्यकता असते. सभोवतालच्या बंधनांना तो कंटाळलेला असो वा नसो. कंटाळलेला असला तर मोकळेपणाची त्याला अधिक गरज असते. नसला कंटाळला तरी देखील त्याला मधूनमधून मोकळीक हवी असते. आपण मुक्त आहोंत, सुटे आहोंत, मोकाट आहोंत, दिल चाहेल तें करायला स्वतंत्र आहोंत–ह्या जाणिवेची माणसाला गरज असते. हा मोकळेपणा तो अनेक रीतींनी उपभोगूं शकतो. तो गप्पा मारील, फिरायला जाईल, खेळत राहील किंवा मी माझ्या गच्चीवर पडून राहिलों होतों त्याप्रमाणें कांहीं न करतां नुसता पडून राहील. तो आपली सुट्टी कशीही घालवो, पण त्याला एक प्रकारच्या सुट्टीची, मुक्ततेची जरुरी असते. इतकेंच नाहीं, तर तो त्याचा हक्क आहे. जो मजूर आहे, हें नाहीं तें काम करतो आहे, त्याला मोकळा वेळ मिळालाच पाहिजे. न मिळाल्यास त्यानें आत्मरक्षणासाठीं त्याकरितां भांडलें पाहिजे, झगडलें पाहिजे. रजा ही शरीरालाच नुसती आवश्यक नसून मनाला देखील तिची फार गरज आहे.

मोकळेपणाची जरुरी शरीराप्रमाणें मनाला देखील आहे असें जें मीं आतां म्हटलें त्याची फोड केली पाहिजे. मनुष्यमात्र हा द्रष्टा आहे, निर्माता आहे, सर्जक आहे. त्याची दृष्टि लहान असो कीं मोठी असो, त्याची निर्माण-शक्ति, सर्जनशक्ति अल्प असो कीं अगाध असो, ह्या त्याच्या दृष्टीला आणि

शक्तीला आपलें सामर्थ्य दाखविण्याला अवसर मिळालाच पाहिजे. वॉटर्लूची लढाई ईटन आणि हॅरोच्या क्रिकेट-ग्राउंडवर लढली गेली अशा अर्थाची जी इंग्रजी म्हण आहे तिचा भावार्थ हाच आहे. सुट्टीच्या क्षणांतच खरी निर्मिति होऊं शकते. मनुष्याला समजो वा न समजो, त्याच्या हातून कांही ना कांहीं निर्मिति होतच असते. तो त्याचा स्वभावधर्म किंवा मनोधर्म आहे. त्यावांचून त्याला चैनच पडायचें नाही.

मुलें पतंग उडवतांना असल्याच भावनाचा—कळत किंवा न कळत-अनुभव घेत असतात. ती एक त्याची सृष्टि असते. विश्वामित्रासारखी—परंतु शुद्ध हेतूनें निर्माण केलेली—ती एक प्रतिसृष्टि असते. ह्या आपल्या सृष्टीत त्याना आकाशात विहार करता येत नाही. पण त्याच्या ह्या नव्या पतंगसृष्टीत ते वाटेल तितकें उंच उडूं शकतात, घारीशीं स्पर्धा करूं शकतात, दुसऱ्या पतंगाशीं लढूं शकतात. आणि ही लढाई तरी कुठें चालते? तर वर आकाशांत! पुन्हा मौज अशी, कीं ह्या सर्व सृष्टीच्या व्यापारांत सर्जकाला आपली जागा काही सोडावी लागत नाहीं! जागच्या जागी उभें राहून, दोरा कमीजास्त सोडून, हाताला थोडीफार मुरड देऊन त्याला प्रतिसृष्टीचा आनंद उपभोगतां येतो. आपल्या कामनाची पूर्ति, आपल्या इच्छाची अनुभूति त्याला बसल्या जागीं किंवा उभ्या असल्या जागीं पाहायला व घ्यायला सापडते.

आणि मग माझ्या मनांत एक विचार चमकून गेला, की त्या मुलांच्या पतंगसृष्टीप्रमाणेंच आपली सृष्टि ही देखील ईश्वराच्या कामनेचा विलास—कामनेची लीलातर नसेल ना? असेलही कदाचित्. उपनिषदांत एके ठिकाणीं 'स अकामयत्'—ईश्वरानें कामना केली, इच्छा केली—असे म्हटले आहे.

तें कसेंही असो. प्रतिसृष्टि निर्माण करण्याचा हा आनंद सर्वांना उपभोगतां येण्याजोगा आहे. ह्याकरितां पैशाची किंवा मनःस्वास्थ्याची कांहीच गरज नाहीं. तुम्ही गरीब असां कीं श्रीमंत असां, तुम्हांला आपल्या इच्छेप्रमाणें नवें जग निर्माण करणें सहज शक्य आहे. थोडीशी तुम्हांला फुरसद असेल, थोडीशी तुम्हांला विश्रांति मिळेल, मनःस्वास्थ्यापेक्षां विशिष्ट रसिक मनोवृत्ति तुमच्या ठिकाणीं असेल, तर 'ह्याचि देही आणि हयाचि डोळां' कोणत्याही प्रकारच्या निर्मितीचा सुखसोहळा तुम्हांला अनुभवता येईलच येईल.

# भटक्या

चैनीचे आणि सुखोपभोगाचे माझे जे कांहीं प्रकार आहेत त्यांत भटकण्याचा अंतर्भाव मी प्रामुख्यानें करतों. माझ्या उमरीला गेल्या डिसेंबरात उणीपुरीं छत्तीस वर्षे झालीं. एवढ्या दीर्घ काळात मी भटकण्याच्या पायीं (वयाची पहिलीं सात वर्षे वजा करून) रोजीं दोन तास ह्या हिशोबानें आतांपर्यंत निदान वीस हजार तास तरी घालविले असतील! (कोंवळ्या वयाच्या वाचकानी हे गणित करून बघावे. चूकभूल द्यावी घ्यावी.) ह्या दुर्लभ नरदेहाचा केवढा हा दुरुपयोग झाला असें मुमुक्षु लोकाना वाटण्याचा सहज संभव आहे. ह्याच्या उलट सुखेच्छूना वाटेल, भटकण्याऐवजी वीस हजार तास मीं झोप घेतली असती किंवा सोंगट्या, पत्ते, कॅरम, टेनिस, बॅडमिटन इत्यादि खेळ खेळलो असतों, तर खुशालचेंडूंच्या यादीत माझें नाव प्रामुख्यानें नसतें का झळकले? ह्या दोघांचेंही म्हणणें खरे असले तरी माझी ही विशिष्ट चैन मी कांही सोडायला तयार नाही. अगदी व्यसनाच्या सदरात गेली आहे माझी ही चैन. आणि व्यसन म्हटलें की तें सोडणे महाकठीण कर्म आहे असें एका महात्म्यानें म्हटल्याचें मला स्मरतें.

वयाच्या आठव्या वर्षापासून मी भटकत आलों आहें. सुरत जिल्ह्यांतील बलसाड गांवी त्या वेळी मी होतों. त्या गावावर अगदीं अजूनही मी निहायत खूष आहे. निसर्गसौंदर्याने नटलेले तें गांव आहे. दोन नद्या, एक डोंगर आणि विशाल सागर ह्यानी त्या गावाला अपूर्व शोभा मिळवून दिली आहे. पाचूच्या कमरपट्ट्याप्रमाणे नद्या त्या नगरीची शोभा वाढवितात आणि पश्चिम समुद्र तिच्या पायाना आपल्या लाटांनीं गुदगुल्या करीत असतो. तेथील फुलाफळांच्या बागा आपल्या सौरभाने आणि रसवत्तेनें रसिकांचें मन आपल्याकडे ओढून घेतात. आणि वयस्कर वडिलाप्रमाणें पारनेऱ्याचा डोंगर ही सर्व शोभा दुरून पण हसऱ्या नजरेने बघत असतो. ह्या गांवाच्या सुरम्य परिसरांत मी खूप खूप भटकलों आहें. बलसाड ते तिथल हें जाऊन येऊन सहा मैलांचें अंतर आहे. दर शनिवारीं मी समुद्रदर्शनाला जाऊन येत असें. जातांना

संध्याकाळ असे व येताना रात्र होई. रातकिड्याचा किर्रकिर्र आवाजही त्या ल्हान वयात मला भीतिदायक न वाटतां गूढरम्यतेने भरलेला वाटे. वाटेंत ताड, शेंद्री, नारळ, करंजाचीं झाडें लागत. त्याच्या विशिष्ट वासानें माझें मन भारलें जाई आणि माझी पावले न कळत मंदावत. अजून आठवतात मला ते दिवस.

भटकण्याचा आनंद लुटण्याविषयीं मी माझ्या मुलाला सागतों. पण त्याला त्याची आवड दिसत नाही. तो घरात किवा आळीत खेळण्यात वेळ घालवितो. घरबशा किवा आळीबशा आहे तो. मला वाटते, हल्लींच्या मुलाना फिरायला एकंदरीत कमीच हवें. मी भटकलो तसे ह्या मुलांना भटकावेंसें कां वाटत नाही? लहानपणी मातापितराच्या सहवासात वेळ घालविणें जितकें अगत्याचें आहे, तितकेंच निसर्गाच्या, झाडाझुडपाच्या, नदीसमुद्राच्या सहवासांत घालविणें जरुरीचे आहे. केवढे अमोल व अगाध शिक्षण निसर्गा-कडून आपणाला नकळत व सहज मिळतें? शरीराचे विविध स्नायु व मन ह्यांना केवढा व्यायाम मिळतो मोकळया रानात फिरल्यानें?

भटकण्याच्या वेगवेगळ्या तऱ्हा असूं शकतात. कित्येकाना मित्रमंडळीचा परिवार बरोबर घेऊन फिरायला जायला आवडते, तर काहींना एखादद्दुसरा शेलका स्नेही बरोबर घेऊन घराबाहेर पडायला रुचते. मला मात्र एकटेच भटकायला आवडतें. वाटेत कोणी ओळखीचा भेटल्यास त्याला डावलून मी जात नाहीं किवा एखादे वेळीं स्नेह्याच्या संगतीत सापडून त्याच्याबरोबर फिरायला जावें लागले तरी त्यालाही मी कंटाळत नाहीं. परंतु अशा प्रसंगी, मी एकटा असतांना मला जितका आनंद वाटतो, तितका मुळीच वाटत नाही. अगदीं जखडल्यासारखें वाटतें मला अशा वेळी! एखाद्या मित्राच्या घरी जाऊन मधून मधून गप्पागोष्टी करायला मला मनापासून आवडतात; पण भटकायला निघालों असतांना मला बोलणें मुळींच पसंत नाहीं. अशा वेळीं माझें निसर्गाशीं हितगुज चाललेलें असतें. दोन प्रेमी जीवांच्या मीलनासारखें आमचें त्या वेळीं नातें असते! आणि अशा प्रसंगीं त्रयस्थाची उपस्थिति किती बोचक, जाचक असते ह्याचा अनुभव कांहीं वाचकांना तरी खात्रीनें असेल!

भटक्या

निसर्गाच्या दिसेल त्या स्वरूपाकडे एकसारखें बघत राहावेंसें मला वाटतें. निसर्गाचें सौंदर्य डोळे भरून पाहावें आणि त्याचें संगीत कान भरून ऐकावें अशी एक प्रकारची अंतरींची ओढ लहानपणापासून मला लागली आहे. काळसर हिरव्या गर्द झाडीकडे तास न् तास बघण्यांत मला धन्यता वाटते. एखाद्या श्यामलेसारखी मोहक दिसते ती माझ्या डोळ्यांना. मोठमोठ्या वृक्ष-राजाना पाहून माझें मस्तक विनम्र बनतें. सूर्यप्रकाशाचा जो मजेशीर खेळ चालतो झाडांच्या पानांशीं, तो बघितला आहे का आपण? एकच सूर्यप्रकाश; पण तो श्रीकृष्णाप्रमाणे विविध रूपें धारण करीत असलेला आढळतो. कोवळीं लाल पानें, तरुण हिरवीं पाने आणि वृद्ध पिवळीं पानें, ह्या सर्वांवर सूर्यकिरणें पडून ज्या मनोरम रंगछटा निर्माण होतात त्या कमालीच्या सुंदर असतात. अशा वेळीं लाडिकपणानें वाऱ्याची झुळुक येऊन पानांना हालवून गेल्यास कांही पुसूंच नका! मूर्तिमंत काव्य अवतरल्याचा भास होतो अशा वेळीं.

सुगीच्या दिवसांत शेतांत ऊनसावलीचा जो लपंडाव चालू असतो तोही अगदीं प्रेक्षणीय असतो. पिवळसर, लालसर, किरमिजी रंगांच्या नाचऱ्या कणसांवर मध्येंच ऊन आणि मध्येच सावली पडून जी शोभा निर्माण होते, तिची गोडी अगदी अवीट आहे. आणि शरद् ऋतूंतील पांढरे ढग वर्षा ऋतूंत अगदीं जेरीस आलेले असतात ते. पाऊस पाडपाडून थकून जातात गुलाम! आणि म्हणून आतां जागच्या जागी सुस्तावल्यासारखे पडून असतात बिचारे! त्यांच्यावर जो सूर्यप्रकाश चकाकतो त्याची कांहीं वेगळीच जात आहे. मी चित्रकार नाही ह्याबद्दल मला किती वाईट वाटतें! निसर्गाच्या नाजूक छटांना रंगकुंचल्याच्या साहाय्यानें चित्रकार अमर स्वरूप देऊं शकतो. निसर्गाचे स्वरूप चित्रकाराइतकें, मला वाटते, कोणालाच कळलें नसेल. हृदयां-तरींचें अगदी नाजूक भाव त्याच्याखेरीज कोणालाच इतके चांगले समजत नाहींत. कवीला कदाचित् निसर्गाचें स्वरूप कळत असेल. माझ्यासारख्या गद्यलेखकाला मात्र निसर्गाकडे नुसतें पाहूनच समाधान मानून घ्यावें लागतें. पण असल्या पाहाण्याची देखील लज्जत, खुमारी कांहीं और आहे ह्यांत शंका नाहीं. निसर्गाची गोडी ही वर्णन करून सांगण्याजोगी गोष्ट नाहीं. निदान मला तरी ती सांगतां येत नाहीं. आणि म्हणून मी एकटेंच फिरायला जाणें पसंत करतों.

फिरस्ता, भटक्या, प्रवासी ह्या शब्दांवर माझी भटकण्याइतकीच प्रीति आहे. विश्वाचे सर्व दरवाजे, सर्व खिडक्या मोकळ्या झाल्यासारखें वाटतें हे शब्द पाहिल्यानें. विश्वाची अगाधता फिरस्त्याला जी आकलन होईल ती घरबशाला कशी होणार ? जें जें पाहूं त्याचे त्याचे आपण स्वामी नसलों तरी रसिक उपभोक्ते आहोंत अशी जाणीव भटक्याच्या ठिकाणीं असते. जसजशीं त्याचीं पावलें पुढेंपुढें पडत जातात, तसतशी विश्वाची अपूर्वाई, नवलाई, रहस्य हीं त्याला कळूं लागतात. एखादें बालक जसें आईच्या हाकेनें आकर्षिलें जातें तसा तो अनंताच्या, दूरच्या, परंधामाच्या ओढीनें आकर्षिला जातो. मी प्रवासी आहें, अनंताचा प्रवासी आहें, असें म्हणून चालणाऱ्याचीं पावलें दमदार पडतात. आपणाला पुष्कळ कार्यें करायचीं आहेत ह्याची जाणीव त्याला असते. नवीं नवीं कार्यांची क्षितिजें त्याला दिसूं लागतात. त्यांच्या रंग-छटांनीं उत्तेजित, प्रेरित होऊन तो पुढें पुढें जातो आणि मग भाग्यश्री, जयश्री हटकून त्याला माळ घालते. चरति चरतो भगः । इंद्र इच्चरतः सखा । ( फिरणाऱ्याचें भाग्यही फिरतें, समृद्ध बनतें. कारण इंद्र हा फिरणाऱ्याचा सखा असतो. ) मला वाटतें, ह्याचमुळें एक प्रकारच्या अंतःप्रेरणेनें लहानपणा-पासून मला भटकण्याची, खूप खूप भटकण्याची, रानावनांतून भटकण्याची सवय लागली असावी. मीराबाईला हरिचरणाची चटक लागली होती. मला भटकण्याची चटक लागली आहे. ज्याप्रमाणें एखाद्या संताला दुसरा संत भेटला असतांना जीवींचें समाधान वाटतें, त्याचप्रमाणें एखादा समानशील भटक्या भेटला असतांना मलाही समाधान वाटतें. आपणाला नाहीं असें वाटत ? वाटत नसल्यास आजपासूनच आपण भटकायला सुरुवात करा. अमोल सुखाचा ठेवा हस्तगत झाल्यासारखा आपणाला वाटेल.

# मिश्रराग

कांहीं दिवसांपूर्वी मी एका गाण्याच्या मैफलीला गेलों होतों. रात्रीची प्रशांत वेळ होती आणि गायक खरा कलावंत असल्यानें गाण्याला अगदीं रंग भरला होता. प्रत्येक नव्या गाण्याला नवा नवा बहर—नवा नवा ढंग—नवी नवी लज्जत येऊन सर्व श्रोते, स्वतः गायक, त्याच्या बरोबरीचे साथीदार हे एक-प्रकारच्या नादब्रह्मांत लीन झाल्यासारखे दिसत होते. गायनाच्या ठिकाणी इतकी मोहिनी असूं शकेल असें मला पूर्वी कधीही वाटलें नव्हते. पण त्या दिवशीं माझी खात्री झाली, कीं सुप्रसिद्ध आंग्ल कवि ब्राऊनिंग म्हणतो तेंच खरें. संगीत ही देवांची वाणी आहे, देवांची भाषा आहे.

गाणें इतकें रंगलें, कीं ह्याचा विचार करायला मला फार वेळ घालवावा लागला नाहीं. सनातनी पद्धतीचें शुद्ध रागदारीचें गाणें आळविण्याऐवजीं त्या रात्रीं गायकानें सर्व मिश्रराग गाऊन दाखविले. पिलू रागाच्या बैठकीवर मांड दरबारी, खंबावती, मालकंस, बागेश्री, पूर्या इत्यादि रागाचें नृत्य त्यानें इतक्या सफाईनें, इतक्या शास्त्रशुद्ध रीतीनें, इतक्या कलापूर्णतेनें करून दाखविलें, कीं एका रागांतून तो दुसऱ्या रागात जातांच श्रोत्यांच्या माना डोलूं लागत आणि त्यांच्या मुखावाटे 'वाहवा' 'खाशी' असे धन्योद्गार निघूं लागत त्याचें तें निरनिराळ्या रागांना छेडणें—नाचविणें पाहून मला तर इंद्रधनुष्याचीच आठवण झाली. इंद्रधनुष्यांतील विविध रंग कुठें संपतात आणि कुठें सुरू होतात हें बोट ठेवून जसें दाखवितां येत नाहीं पण कळतें मात्र, तद्वतच एक राग संपवून ते दुसऱ्या रागात केव्हां जात हें समजलें नाही तरी लवकरच ध्यानांत येई! एकेक राग एकेक तास आळविण्यांत कलावंताची रागांवरील तयारी व्यक्त होत असेल, एखाद्या भव्य शिल्पकृतीप्रमाणें रागाचें संपूर्ण दर्शनही घडत असेल, पण मिश्ररागांची जी गोडी आहे ती काहीं और आहे असें मी तरी म्हणेन. आधुनिक युगांत एक प्रकारचें बंड करून ज्या नवीन गोष्टी आपण मिळविल्या व पुढेंही मिळवूं, त्यांत संगीताच्या क्षेत्रांत शुद्ध रागाची जी मिरासदारी होती ती कमी होऊन मिश्रराग जे हल्लीं सुरू आहेत त्यांची

प्रामुख्यानें गणना करतां येईल. घट्ट बुद्धीचे जे पंडित असतील त्यांना माझें म्हणणें कदाचित् मान्य होणार नाहीं. पण कोणत्याही सजीव गोष्टीप्रमाणें कला देखील एक सजीव प्रगतिशील गोष्ट आहे असें मानल्यास तिची वाढ विशिष्ट तऱ्हेनें झालीच पाहिजे. आणि ह्याच दृष्टीनें मिश्ररागांचा जो प्रसार होतो आहे त्याचे अभिनंदन केल्याखेरीज मला राहावत नाहीं.

आणखीही कांही कारणांकरिता मिश्ररागाची तरफदारी मला करावीशी वाटते. मिश्रराग हा स्वाभाविक आणि सुंदर प्रकार आहे. आणि त्याचा आविष्कार अनेक प्रकारांनीं जगांत हरघडी पाहायला सांपडतो. निसर्गाकडेच पाहाना. एकच एक निळ्या किंवा भुऱ्या रंगाचा कंटाळा येऊन वर्षा आणि हेमंत ऋतूंत आकाशांत सकाळी आणि संध्याकाळी रंगाची नुसती लयलूट असते. मिश्ररंगांची तरफदारी करण्याकरितांच जणूं काय आकाशांत विविध रंगांचा सडा शिंपलेला असतो. वृक्ष आणि वनस्पति ह्यांच्याकडे बघा. त्यांत किती विविधता, संमिश्रता आहे ! पानाचे रंग आणि आकार, वृक्षांची उंची आणि घेर, ह्यांत एकजिनसी एकेरीपणा नसून संमिश्रताच अधिक आहे. जमिनीकडे बघा. तींत दऱ्या, पर्वत, टेकड्या, सपाट जमीन असा सर्व संमिश्र कारभार आहे. आणि त्याचें कारण उघड आहे. सारखेपणा हा कंटाळवाणा असतो हें तत्त्व निसर्गाला अगदी मान्य आहे. संमिश्रता हा सृष्टीचा प्राणच आहे म्हणानात !

स्त्री आणि पुरुष ह्याचे स्वतंत्र एकजिनसी समाज स्वतंत्र आणि एकजिनसी राग आणि रागिण्यांप्रमाणें कितीही चागले दिसले तरी जोंपर्यंत त्यांच्यांत संमिश्रता उत्पन्न होत नाहीं तोंपर्यंत त्यांना कांहीच महत्त्व नसतें. मिश्ररागाप्रमाणें स्त्रीपुरुषाचे मिश्रसमाजच अधिक सुंदर, अधिक उपयुक्त, अधिक परिणामकारक ठरतात. स्त्रीराज्याची किंवा पुरुषराज्याची कल्पना अंमलात आणली असतांना ती किती हास्यास्पद ठरते ह्याचीं उदाहरणें आपल्या पुराणांत तर आहेतच, पण प्रत्यक्ष सृष्टीतही कांहीं कमी नाहीं पाहायला सांपडत. पुरुषसंपर्कापासून कैक मैल स्वतःला दूर ठेवणाऱ्या हट्टी आणि मूर्ख स्त्रियांचे नमुने आपल्या समाजांत कांहीं कमी नाहींत. त्याचप्रमाणें स्त्रिया म्हणजे मूर्तिमंत पाप होय, असें समजून त्यांच्या दिशेकडून येणारा वाराही

अंगाला न लागूं देणारे बोकड ब्रह्मचारीही आपल्यांत आहेत. पण त्यांच्या आयुष्याकडे बघा. त्या आयुष्याचा नुसता सहारा झालेला तुम्हांला आढळेल. कुठल्या तरी दुष्प्राप्य आणि अडाणी ध्येयांच्या मागें लागून जग सुधरायला निघालेल्या त्या जडभरतांकडे पाहिलें कीं त्यांची कींव येते. ह्यांनी लग्नें केलीं तर किती चांगलें होईल असें मला नेहमी वाटतें. प्रौढ कुमारिका आणि प्रौढ कुमार ह्यांनीं हल्लीं जो स्वतःच्याच ठिकाणीं धुमाकूळ माजविला आहे तो अगदीं विलक्षण आहे. त्यापेक्षां हे लोक एकमेकाच्या जवळ येतील, चहा घेतील आणि परस्परांना चाहूं लागतील तर किती बहार होईल !

माझ्या माहितींत एक ब्रह्मचारी आहे. चागला नैष्ठिक ब्रह्मचारी आहे. शनिवारीं मारुतीचें दर्शन आणि उपवास हीं तो कधींही चुकवीत नाहीं. त्याचा व्यासंग म्हणजे स्त्रियांखेरीज सर्व विषयांचा आहे, सर्व विद्या आणि सर्व कला ह्यांचा अभ्यास त्यानें केला आहे व पुढेंही करण्याचा त्याचा मनसुबा आहे. अशा मनुष्याच्या ठिकाणीं निश्चयाचें तेज आणि प्रसन्नता हीं दिसायला हवीत. पण तो सदा दुर्मुखलेला आणि वखवखलेला असतो. स्त्रिया पाहिल्या कीं त्याला वास्तविक कांहीं वाटूं नये. पण विजेची गाडी जवळून जावी त्याप्रमाणें एखादी स्त्री जवळून गेली की तो चार पावलें मागें सरतो. आणि मग कौतुकानें तिच्याकडे पाहाण्याचें सोडून जागच्या जागीं उसासे आणि निश्वास टाकीत राहातो. कळ्यांच्या निश्वासाप्रमाणें लवकरच एखादी विभावरी शिरूरकर 'फुलांचे उसासे' नांवाचा लघुकथासंग्रह माझ्या मित्राला उद्देशून काढील तर बरें होईल अशी जाहीर इच्छा येथें प्रगट केल्यावांचून मला राहावत नाहीं.

मनुष्यस्वभावाचा विचार करीत असतांना देखील मला शुद्ध रागापेक्षां मिश्र-रागाचीच जरूरी आणि उपयुक्तता अधिक पटते. एकच एक गुणधर्माचीं माणसें मला तरी फारशीं आवडत नाहींत. सदोदित मारक्या म्हशीच्या डोळ्यांनीं जगाकडे बघणारा रागीट मनुष्य मला जसा आवडत नाहीं, तसाच एखाद्या धबधब्याप्रमाणें आपल्या प्रेमाचा वर्षाव सतत करणारा मनुष्यही मला आवडत नाहीं. डिंकाप्रमाणें लोभ करणारा मनुष्य जसा मला रुचत नाहीं, त्याचप्रमाणें गांधीलमाशीप्रमाणें जो भेटेल त्याला डसणारा जीवही मला जवळ करावासा

वाटत नाहीं. मत्सर, द्वेष, ममता, शोक इत्यादि मनोविकार स्वतंत्रपणानें आणि उत्कटत्वानें ज्याच्या ठिकाणी वसत असतात अशी माणसे मला डोळयां-समोर देखील पाहायला आवडत नाहीत. मरेपर्यंत आपला स्वभाव आणि मनो-धर्म न बदलणारीं माणसें पुष्कळ वेळा कौतुकाचा विषय होतात हें मला माहीत आहे. आणि विशेषतः त्याचे मनोधर्म चांगल्या स्वरूपाचे असल्यावर ते अभिनंदनीय वा वंदनीय ठरावेत ह्यांतही काही नवल नाहीं. पण मला स्वतःला मात्र अशा लोकांबद्दल कांहीं विशेष वाटत नाहीं. साऱ्या जन्मांत एखादा मनुष्य कधीही रागावला नाहीं, कधीही रुसला नाही, कधींही चिडला नाही, कधीही असत्य बोलला नाही, कधीही कधींही दुर्वर्तनानें कलंकित झाला नाहीं असे मला कळले तर त्या मनुष्याला मी जागच्या जागीं फार झालें तर वंदन करीन; पण त्याच्याजवळ जाऊन त्याची मैत्री कधीही करणार नाहीं. आणि मला वाटतें आपणही असेंच कराल.

कल्पना करा; आपला एखादा मित्र किंवा मैत्रीण आहे, आणि त्याच्या किवा तिच्या ठिकाणीं एखादीच मनोभावना प्रबळ आहे. अशा मित्राची किवा मैत्रिणीची प्रीति राखणें तुम्हांला फार कठिण होऊन बसेल. कारण तुमचा स्वभाव त्याला किंवा तिला नीट समजणार नाहीं. तुम्हाला ज्या वेळी सहानु-भूतीची अपेक्षा असेल त्या वेळीं तुमचा मित्र म्हणेल, " बाबारे, जग हें नश्वर आहे. तस्मात् गेलेल्याचा वृथा शोक कां करतोस ? " अशा वेळी त्या मित्राची गालफडें रंगवावींशी तुम्हांला वाटणें साहजिक आहे. आणि समजा, त्याप्रमाणें तुम्हीं केलेंत तरी देखील येशू ख्रिस्ताच्या किवा एकनाथाच्या शांतीनें तो म्हणेल, " अज्ञानाला बळी पडल्यानें माझें सांगणें तुझ्या गळी आतां उतरलें नाहीं, तरी खरें ज्ञान हें त्रिकालाबाधित आहे. वृथा शोक करणें हें व्यर्थ आहे. माझा राग आला असल्यास माझें हें दुसरें गालफड आहे. तें वाटल्यास रंगीव." माझी खात्री आहे अशा वेळीं तुम्हीं त्याचें गालफड न रंगवितां, स्वतःच्याच तोंडांत मारून घ्याल आणि त्याचा संबंध कायमचा सोडून द्याल !

तुमचें तें करणें अशा वेळीं अगदीं योग्यच ठरेल. कारण कोणत्याही मनु-ष्याच्या ठिकाणीं आपण सर्व प्रकारच्या मनोधर्माची अपेक्षा करतों. मनुष्य म्हटला कीं तो जसा रागावला, रुसला, प्रेमानें डोलला, द्वेषानें उसळला पाहिजे

त्याचप्रमाणें दुसऱ्याच्या ठिकाणचे हे भावही त्याला कळून त्यानें सहानुभूति अनुभविली पाहिजे आणि दुसऱ्याला ती दर्शविली पाहिजे.

माझ्यावर सदोदित प्रेम करणारी, कधीही माझ्यावर न रागावणारी, माझ्या अपराधाकडे दुर्लक्ष करणारी, माझ्या ठिकाणच्या एवढ्याशा गुणाचेंही कौतुक करणारी, मला कुठें ठेवूं आणि कुठें नाहीं असें होणारी, कनवाळूपणाने माझ्या सर्व कृत्याकडे बघणारी, सदोदित माझा ध्यास धरणारी, माझ्या वाटेकडे डोळे लावून बसणारी, मी टाकून बोललो तरी उलट उत्तर न करणारी, माझ्याशीं कधीही न चिडणारी, मला कधीही न फसविणारी, माझा कधींही त्याग न करणारी एखादी स्त्री, अगदी तरुण व सुस्वरूप स्त्री मला जर भेटेल तर तिला मी आई म्हणेन पण मैत्रीण मात्र कधीही म्हणणार नाहीं. आणि ह्याचे कारण उघड आहे. संमिश्र रागाप्रमाणेंच संमिश्र स्वभावाची गोडी अगदीं अवीट आहे.

# चाट बनणें !

प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत—कमीअधिक प्रमाणांत—चाट बनण्याचे प्रसंग केव्हां ना केव्हांतरी येतातच. अगदीं अजिबात कधीही एखादा मनुष्य चाट बनला नाही असें होणेंच शक्य नाहीं. आजपर्यंत इतके लोक चाट बनले आहेत, की मनुष्याची व्याख्या ' चाट बनणारा प्राणी ' अशी करायला कांहीं हरकत नाहीं.

प्राचीन काळांतील थोर पुरुष घ्या किंवा अर्वाचीन काळांतील थोर पुरुष घ्या, त्यांच्यावर चाट बनण्याचे प्रसंग येऊन गेले आहेत असें तुम्हांला आढळेल. एवढा मोठा प्रभु रामचंद्र ! पण तोही बिचारा चाट बनल्याखेरीज राहिला नाहीं. रामराज्याला कोणीही दोष ठेवूं शकणार नाहीं असें त्याला वाटूं लागतें न लागतें तोंच एका रजकानें त्याच्या वर्मावर, त्याच्या मर्मावर, त्याच्या कीर्तीवर डांबर ( त्या काळी डांबराचा शोध लागला असल्यास ) फासलें ! श्रीकृष्णाची थोरवी काय वर्णावी ! पण त्याच्यावर देखील चाट बनण्याचे प्रसंग वेळोवेळीं येत. आणि हें साहजिकच आहे. एका बायकोशी संसार करीत असतांना आपण जर चाट बनतों, तर सोळा हजार एकशेंआठ कामिनींच्या गरजा भागवितां भागवितां श्रीकृष्णाला चाट बनण्याचे किती प्रसंग निर्माण झाले असतील त्याचे गणितच करावें लागेल. नारदमुनींची तीच तऱ्हा. त्रिभुवनाला चाट बनवीत फिरणाऱ्या ह्या ब्रह्मचाऱ्यावर एकदा असा भयंकर प्रसंग येऊन कोसळला, कीं त्या वेळीं त्याला अगदीं नकोसें होऊन गेलें.

जगाच्या राजकारणाच्या अग्रभागीं चमकणारे आजचे थोर पुरुष घ्या. तेही केव्हां ना केव्हांतरी चाट बनले आहेत असेंच दिसून येईल. ॲबिसी-नियाचा सम्राट रासतफारी ह्याचें साम्राज्य आपण चुटकीसरशीं हस्तगत केलें ह्या आनंदांत मग्न असणाऱ्या सिनॉर मुसोलिनीवर देखील चाट बनण्याचा प्रसंग येऊन गेला. रासतफारीनें मुसोलिनीच्या नाकावर वाट करून आपलें गेलेलें साम्राज्य परत मिळविलें. मॅजिनो नांवाच्या अभेद्य तटबंदीच्या आड

आपण एकदम सुरक्षित आहोंत असें मानून चालणाऱ्या फ्रेंच राष्ट्रावर चाट बनण्याचा प्रसंग कसा आला तें सर्वांच्या स्मरणांत असेलच. क्रीटचें बेट आपण कांहीही झालें तरी टिकविणार अशी भरंवशाची भाषा वापरणारे ब्रिटनचे मुख्य प्रधान श्रीयुत चर्चिल घ्या. अगदी अनपेक्षितपणें व अनपेक्षित प्रमाणांत जर्मन वैमानिक दल क्रीटच्या बेटावर येतांच त्यांच्यावर चाट बनण्याचा प्रसंग आलाच. आपले महात्मा गांधी, जीनासाहेब आणि सावरकरमहोदय घ्या. आयुष्यात जितक्या वेळा बापूजींनी उपवास केले, तितक्या वेळां ते थोड्या फार प्रमाणांत चाट बनले होते. काही तरी भयंकर प्रसंग घडावा, गांधीजींना चाट बनल्यासारखें वाटावें आणि त्यानी मग उपवास सुरू करावा असें त्यांच्या जीवनांत कैक वेळां झालें. जीनासाहेब ज्या वेळीं वर्तमानपत्रातून लांबलचक पत्रव्यवहार प्रसिद्ध करीत त्या वेळी मनांत तेही अगदीं सफै जिरलेले असत. आमचे स्वातंत्र्यवीर ज्या ज्या वेळीं खूप आजारी आहेत अशा बाहेर बातम्या पसरत त्या त्या वेळीं त्यांच्यावरही राजकारणाच्या दृष्टीनें पेचप्रसंग निर्माण झालेला असे अशी जी कांहींकांची समजूत आहे तिच्यांत तथ्यांश नाहीं असें कोण म्हणेल ?

थोरामोठ्यानीं ज्या गोष्टीला आश्रय दिला त्या चाट बनण्याच्या वेळीं होतें काय त्याचा विचार अगत्याचा ठरेल. चाट बनण्याच्या प्रसंगाच्या आधीं जी मनःस्थिति किंवा परिस्थिति असेल आणि तिला जबरदस्त व भयंकर असा धक्का ज्या वेळीं बसेल त्या वेळी चाट बनण्याची स्थिति निर्माण होते. मनुष्याच्या मोठेपणाच्या कल्पनेला, त्याच्या महनीयतेला, त्याच्या दृढ समजुतींना, त्याच्या पूर्वग्रहाना, त्याच्या अहंकाराला ज्या वेळी चुरडल्या-भरडल्यासारखें वाटतें, त्याच वेळी तो चाट बनतो. इतर लोक तो जिरला असें समजतात. शिवाजीच्या ऐटीनें आपण घोड्यावर बसून जात असतांना आपणाकडे बघून कोणीं रामराम न केल्यास, किंवा तात्यासाहेब केळकरांसारखें खोकूनही सभागृहांतील श्रोत्यांचें आपल्याकडे लक्ष नसल्यास, किंवा डग्लस फेअरबँक्ससारखे कल्ले ठेवून सुद्धा एकाही पोरीनें आपणाकडे न बघितल्यास, थोर वक्त्याच्या आविर्भावानें आपण बोलत असतांना श्रोत्यांनीं आपली 'आतां पुरे करा हो' म्हणून रेवडी उडवल्यास, किंवा अद्यतन केशवेषा नि अधरभूषा

करूनही आपणाकडे एकाही तरुणाची नजर न वळल्यास आपणावर चाट बनण्याचा भयंकर प्रसंग कोसळतो. कारण ह्या वेळीं आपल्यांतील ' अहं ' ला जोराच्या कानपिचक्या मिळतात. बसला आहे का आपल्या ' अहं ' ला असा कधीं धक्का ? आपण म्हणाल, आमच्या ठिकाणीं 'अहं' ची भावनाच नाहीं, मग तिला धक्का कोठून बसणार ? असें जर असेल तर आपण मुक्त आहांत किंवा अन्य कोणी त्याच कोटींतील आहांत असें मला म्हणावें लागेल. मला मात्र असले धक्के कैक वेळां बसले आहेत.

माझा अगदीं पहिला लेख ज्या वेळी कॉलेजच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झाला त्या वेळीं आपण काहीतरी विशेष केलें असें मला वाटलें. इतकेंच नाही, तर सर्वांचें लक्ष आपल्याकडे आतां लागणार, हेंच ते विश्वनाथ पांडुरंग दांडेकर असें लोक म्हणणार आणि कॉलेजचे आपण अगदीं ' हीरो ' बनणार असेंही माझ्या मनानें घेतलें. सर्वांनीं आपला लेख वाचला असेल आणि सर्वजण आपणाला मानाचे मुजरे करतील अशीही कल्पना मला चाटून गेली. त्या भावनेनें मी सर्वांकडे बघूं लागलों. पण फारच थोड्यांचें लक्ष आपणाकडे आहे असें मला कळून आलें. त्या दिवशीं माझ्या 'अहं'ला पहिला धक्का बसला.

दुसरा धक्का मला माझ्या प्रोफेसरांकडून मिळाला. बऱ्यापैकीं विद्यार्थी म्हणून वर्गांत माझी गणना होत होती आणि माझ्या त्या विशिष्ट प्रोफेसराचें माझ्याविषयी विशेष चांगलें मत होतें. कांहीं वर्षांनंतर मुंबईत एके ठिकाणीं ते प्रोफेसर मला भेटले. मला वाटलें होतें, कीं माझ्या उत्कर्षाची व साहित्यिक कामगिरीची त्यांना माहिती असेल व ते माझी त्याबद्दल पाठ थोपटतील. पण ह्यापैकीं कांहीच झालें नाहीं. प्रोफेसरांना माझी किंवा माझ्या नांवाची पुसटही ओळख नसलेली पाहून मी अगदीं गार झालों.

मला तिसरा धक्का मिळाला सेकंड एल्‌एल्. बी. च्या परीक्षेकडून. एका महान् ज्योतिष्यानें असें महान् भविष्य वर्तविलें होतें, कीं त्या परीक्षेंत मी पहिल्या वर्गांत पहिला येणार ! त्या भविष्यानें उत्साहित होऊन मीं कांहींशा बेपर्वाईनें कायद्याचा अभ्यास केला. परीक्षेच्या जागीं पहिल्याच दिवशीं माझ्या उत्तरपात्रिकेवर शाई सांडली. मला ती गंगौघाप्रमाणें पवित्र वाटली. कारण

शाई सांडणें हें शुभ चिन्ह विद्यार्थीवर्गांत समजलें जाई. त्या शाईचा टिळाही मी कपाळावर लावणार होतों; पण तेवढें धैर्य मला झालें नाही. एका तासांत माझीं उत्तरें लिहून संपत आणि आपण इतरापेक्षां किती हुशार ह्या भावनेनें त्यांच्याकडे कस्पटाप्रमाणें पाहून मी माझ्या उत्तरपत्रिका सुपरवायझरसाहेबांना देत असें. पांच दिवस असे गेले. मी त्या पहिल्या वर्गांत येण्याच्या कल्पनेच्या नशेंतच बेहोष होऊन पडलों होतों. आणि मग परीक्षेचा 'परिणाम' जाहीर झाला. त्यांत मला पहिला वर्ग तर राहोच, पण दुसरा किंवा तिसराही वर्ग मिळाला नव्हता ! कांहीं विषयांत निदान आपणाला माफी असेल असें वाटून मी चौकशी केली. पण हाय ! कोणत्याही विषयात मला पन्नास टक्के गुण मिळाले नव्हते.

आणखी एकदा चाट बनण्याचा प्रसंग कोल्हापूरच्या स्टेशनावर मला आला. स्टेशनाच्या अगदीं जवळ माझ्या मित्राकडे मी उतरलों होतों. ज्या दिवशीं कोल्हापूर सोडायचें असें मी ठरविलें होतें त्या दिवशीं खूप लव-कर मी उठलों होतों. स्टेशन अगदी जवळ म्हणून मित्रानें पहाटे चहा घेऊन निघण्याचा आग्रह केला. चहा घेऊन मी धावत येतों तों गाडी माझ्यापुढून जात असलेली मला दिसली. आपणाला अगदी 'कसा चाट बनलास' असें म्हणत भकूभकू करीत सदर्न मराठाचें एंजिन जातें आहे असें मला त्या वेळीं वाटलें.

अगदीं अलीकडे माझ्यावर चाट बनण्याचा जो प्रसंग आला तो माझ्या सुताराशीं गप्पागोष्टी करताना. खुर्च्या टेबलें बनविणाऱ्या इतर चार सुतारांपेक्षा त्याच्या ठिकाणी थोडी जास्त सौंदर्यबुद्धि आहे एवढीच त्याच्याविषयीं माझी कल्पना होती. तो उत्तम कारागीर किंवा कलावंत आहे ह्याविषयीं माझी खात्री होती. पण तो उत्तम तत्त्वज्ञानीही आहे हें मला माहीत नव्हतें. बारा तास लाकूड आणि रंध्याच्या झटापटींत राहाणारा इसम थोर विचारवंत असूं शकतो ह्याची जाणीव मला मुळींच नव्हती. पण ती त्यानें मला करून दिली. "आपला आत्मा निरनिराळीं सोंगं घेऊन जरी जगांत वावरला तरी त्यानें स्वतःचं स्वरूप विसरूं नये. मी सुतार असलों, लोहार असलों, वकील असलों, मजूर असलों, तरी खरा मी दुसराच आहें. खरा मी निरंजन आहें, निर्विकल्प आहें. जग हा आभास आहे. ती एक ईश्वराची सुंदर कल्पना आहे. आम्ही

ज्याप्रमाणें कल्पनेंतला आकार देऊन सुंदर नक्षीकाम, सुंदर कपाट साध्या लाकडांतून बनवितों, त्याप्रमाणें ईश्वरानें निव्वळ कल्पनेनें जग बनविलं आहे. जग म्हणजे प्रवाही पदार्थांचा नुसता गोळा. त्याच्यातून हे सुंदर दिसणारे स्त्री-पुरुष, पशुपक्षी, कृमिकीटक ईश्वरानें कल्पिले. हे नुसते आकार आहेत. ईश्वराची ही मूर्तिमंत किंवा साकार कल्पना आहे." हें व अशा तऱ्हेचें मौलिक तत्त्वज्ञान जेव्हां त्याची वाणी स्रवूं लागली तेव्हां अगदी थोबाड रंगविल्या-सारखा नम्रपणानें मी त्याच्याकडे पाहूं लागलों. सामान्य समजल्या जाणाऱ्या एका कारागिराच्या तोंडून हिंदु तत्त्वज्ञानांतील उच्च सिद्धात साध्या व सोप्या भाषेंत माडले गेलेले पाहून माझ्या ज्ञानाची मला कींव वाटूं लागली. मी अगदीं सफै चाट बनलों त्या दिवशीं.

आणि त्या दिवसापासून माझा असा ग्रह होत चालला आहे, कीं मधून मधून चाट बनण्याचे प्रसंग माणसावर आले पाहिजेत. स्वतःविषयीं आपल्या ज्या काही भल्याबुऱ्या कल्पना असतात त्या डिवचल्या गेल्या पाहिजेत, त्यांना जोराचे धक्के मिळाले पाहिजेत. आतड्याना ज्याप्रमाणें रेचकाची आवश्यकता असते, त्याप्रमाणें मनाला चाट बनण्याचीही जरुरी असते. ईश्वर किती थोर आहे ! पण तोही बापडा दर वर्षी चाट बनतो. आपण निर्माण केलेल्या सुंदर जगांत विषमता, अन्याय, दुःख, चढाओढ हीं पाहून त्याला अगदीं चाट बनल्यासारखें होतें. त्याच्या वृत्ति अंतर्मुख बनतात आणि मग तो देवशयिनी एकादशीपासून तों देवप्रबोधिनी एकादशीपर्यंत झोपीं जातो. ह्या झोपेचा, हितकारक असाच उपयोग होतो. कारण त्यानंतर डोळे उघडून तो जेव्हां जगाकडे पाहातो तेव्हां त्याला जिकडे तिकडे समृद्धि आणि सुबत्ता आढळते. शेतें धान्यांनीं भरलेली असतात. सरोवरें पाण्यानें तुडुंबलेलीं दिसतात. आकाश निरभ्र असतें. मनुष्याचें मन धुतलें गेलेलें दिसतें.

# असार पसारा

कांहीं दिवसांपूर्वीची गोष्ट. मुंबई शहरांतील ज्या चौकात गिरगांव, सँडहर्स्ट रोड, केनेडी पूल, चौपाटी, ऑपेरा हाऊस इत्यादि रस्ते येऊन मिळतात, त्या चौकाच्या कोपऱ्यावरील एका दुकानाच्या ओट्यावर बसल्या बसल्या तेथून दिसणाऱ्या जनसमुद्राकडे मी बघत होतों. वेळ संध्याकाळ उलटून रात्रींच्या पहिल्या प्रहरची असल्यामुळे ह्या लोकसागराला अगदीं भरती आली होती. मनुष्यांवर मनुष्यांच्या येणाऱ्या प्रचंड लाटा चौकांतील पोलीस अडवून धरून काहीं काळ मोटाररूपी जलचरांना स्वैरसंचार करून देत आणि नंतर ह्या जलचरांची वाट अडवून मानवी लाटांना मोकळ्या सोडीत. ह्या मानवी लाटांत केवढी विविधता होती. अद्यतन पोशाख केलेले तरुण, वेषभूषेच्या बाबतींत रुपेरी पडद्यावरील तारकांना लाजविणाऱ्या नवयुवती, प्रणयाचा पहिला बहर अनुभविणारीं जोडपीं, चाळींतील आयुष्याला कंटाळलेले संसारी जीव, आयुष्याची संध्याकाळ अनुभवूं लागलेले म्हातारे, काबाडकष्टांतच आपला जीव खपणार असे मानणारे कामगार व त्यांच्या स्त्रिया, फिरण्याखेरीज ज्यांना कांही जीवितकार्य नाहीं असे उडाणटप्पू लोक, अशी विविध प्रकारची मंडळी घाई-घाईनें चालली होती. समुद्रांत एवढ्या लाटा येतात कोठून ह्याचें जसें एखादे वेळीं आपणाला आश्चर्य वाटतें, तसेंच इतके हे लोक येतात कोठून ह्याचें त्या वेळीं मला आश्चर्य वाटलें. चौपाटीकडील लोक सँडहर्स्ट रस्त्याकडे जाताहेत, गिरगांवाकडील लोक चौपाटीकडे जाताहेत, कांहीं हौशी लोक ऑपेरा हाऊस-मध्यें चाललेला 'मदर इंडिया' हा बोलपट पाहायला जाताहेत, मधून मधून निरनिराळ्या आकाराच्या व रंगाच्या मोटरी धावताहेत, अशी एकच विलक्षण गर्दी त्या चौकांत उडाली होती. आणि ह्या गर्दीवर विद्युद्दीप प्रकाशात असल्यामुळें तिला एक विशिष्ट प्रकारची शोभा आली होती. फिरून फिरून थकल्यामुळें मी ओट्यावर बसलों होतों आणि त्या गर्दीचें कोडें उलगडण्याचा मनाशीं प्रयत्न करीत होतों. ही गर्दी जाते आहे कुणीकडे ? तिचें उद्दिष्ट काय ? ही गेली होती कुठें ? तिचें अस्तित्व किती काळ आहे ? अनंतकाळपर्यंत ही

अशीच का गर्दी राहाणार आहे ? हे लोक एवढे गर्दीत का ? घडीची देखील ह्यांना उसंत असूं नये का ? हे खरोखर घाईत असतात कीं आहोंत असें दाखवितात ?—असे एक कीं दोन अनेक प्रश्न माझ्या डोक्यात उत्पन्न होत होते; पण त्यांचें उत्तर—बिनचूक उत्तर—मला काहीं सांपडत नसल्यानें मी विमनस्क अवस्थेंत आपला बसून होतो.

इतक्यात जवळच्या हॉटेलातून रेडिओद्वारा स्वरलहरी ऐकूं येऊं लागल्या—**—असार पसारा व्यर्थ संसार सारा.** माझ्या मनाला बरे वाटलें. आतां-पर्यंत वाटत असलेलें कोडें उलगडलें गेलें, ह्या आनंदानें मी जागच्या जागींच जरा ताठ होऊन बसलों. माझ्या समोर भरतीला आलेल्या लोकसागराला कांहीं खरोखर किंमत आहे का ? असारच नाहीं का हा सारा पसारा ? मोटरी, गाड्या, माणसें, त्यांचा भपकेबाज पोशाख, विद्युद्दीप, लोकांची धादल, ह्या सर्व गोष्टी असारच नाहीं तर काय ? लोकानीं माडलेला हा सारा संसार व्यर्थ, अगदीं व्यर्थ होय. ह्या क्षणाला दिसणाऱ्या लोकसागराला शंभर वर्षांपूर्वी कांहींच अधिष्ठान नव्हतें, आणि आणखी कांहीं वर्षांनीही कांही अस्तित्व राहणार नाहीं. असल्या क्षणजीवी गर्दीला 'असार पसारा' ह्याखेरीज दुसरें काय तुम्ही नांव देणार ?

क्षणापूर्वी मनांत उडालेलें काहूर कांहींसें कमी झाल्यासारखें मला वाटलें. हा सर्व खोटा पसारा आहे, ह्या जाणिवेनें मनांतला गोंधळ बराच कमी झाला. पण मनाला पूर्ण शांति मिळायला पाहिजे ती कांही मिळाली नसल्यानें पुन्हां माझी वृत्ति विमनस्क, बेचैन बनली. समोरच्या पायवाटेवर उभ्या असलेल्या एका स्त्रीकडे माझें लक्ष गेलें. साधारण सुरेखांत जमा होईल अशी ती तरुणी होती. तिचा चेहरा पूर्णपणें भावशून्य असा दिसत होता. माझ्याचप्रमाणें तीही गर्दीकडे पाहात उभी होती. आणि मला वाटलें, तिलाही ती गर्दी माझ्याच-प्रमाणें असार, व्यर्थ वाटत असावी. किती तरी वेळ ती तशीच उभी होती. अगदीं एखाद्या निर्जीव पुतळीप्रमाणें उभी होती. तिचें उभें राहाणें देखील मला व्यर्थच वाटूं लागलें. तिथल्या त्या असार पसाऱ्यांत गर्दी करायला ही स्त्री कशाला हवी होती, असें मला मनांतल्या मनांत वाटूं लागलें. तोंच पूर्वीच्या असार गर्दीकडे पाहात असतांनाच तिची कळी उमलल्यासारखी

पाहून मी स्तंभितच झालों! त्या गर्दीतून वाट काढीत तिच्याकडे येणाऱ्या एका तरुणाला आणि एका लहान मुलाला पाहून पूर्वीचा तिचा भावशून्य चेहरा भावपूर्ण बनला! तिच्या गालावरील गुलाब फुलल्यासारखे मला वाटले. तिच्या डोळ्यांतील चमक मला कांही और दिसूं लागली. त्या लहान मुलाला तिनें उचलून आपल्या हृदयाशी घट्ट दाबलें, आणि तरुणाकडे प्रेमळ नजरेनें बघत तिनें त्याच्याबरोबर रॉयल ऑपेरा हाऊसमध्यें प्रवेश केला!

तेवढ्या त्या घटनेनें माझ्या मनांतील कोडें पूर्णपणें उकललें गेलें. माझ्या-समोर असलेल्या गर्दीला—त्या मानवसागराला—'असार पसारा' म्हणून संबोधायला आता मी मुळींच तयार नव्हतों. कारण माझ्या एका व्यक्तीच्या दृष्टीनें तो कदाचित् 'असार पसारा' असला, तरी मुळांत तो तसा मुळींच नाहीं, अशी माझी खात्री झाली. त्या 'असार पसाऱ्या'तच किती तरी जणांच्या थोर आशा नि उज्ज्वल आकांक्षा निगडित झाल्या असतील. माझ्या दृष्टीनें व्यर्थ वाटणाऱ्या त्या गर्दीतच ज्यांची घरीं गृहिणी वाट पाहात आहे असे पति असतील. त्यांना त्या पतींच्या आगमनानें केवढा मोठा आनंद होईल! महत्त्वाचे आणि फायदेशीर संदेश नेणारे दूत त्या गर्दीत असतील. ज्याना ते आशादायी संदेश मिळतील त्यांना केवढी धन्यता वाटेल! मृत्यूशी झगडत असलेल्या जीवांना अमृतौषधी देणारे वैद्य असतील. त्यांना पाहून रोग्यांना किती हुरूप आल्यासारखे होईल! अशा एक कीं दोन अनेक व्यक्ति अनेक प्रकारच्या कार्यात गुंतलेल्या, अनेक प्रकारचीं उद्दिष्टें असलेल्या त्या गर्दीत खचित असतील. आणि मग असल्या जमावाला 'व्यर्थ पसारा' हें नांव आपणाला कसें देतां येईल? ज्याचा त्या गर्दीशीं कांहीं देखील संबंध नाहीं, त्याच्या दृष्टीनें तो 'असार पसारा' असला, तरी मुळांत तो तसा नाहीं. त्या पसाऱ्याला सार आहे, महत्त्व आहे, ध्येय आहे, आणि गति तर आहेच आहे. त्या गर्दीला 'असारा पसारा' म्हणून क्षणापूर्वी संबोधणाऱ्या माझ्या मनाची मला कींव करावीशी वाटली. त्या समूहाला 'व्यर्थ' म्हणून म्हणणें हा त्याचा मोठा अपमान होय असें मला वाटलें.

आणि जो अपमान माझ्या नकळत त्या जनसंमर्दाचा मीं केला, तसा अपमान ईश्वरानें निर्माण केलेल्या ह्या सुंदर जगाचा कांहीं विचारवंत

करीत असलेले पाहून मला वाईट वाटलें. जग हें मिथ्या आहे, प्रपंच हा पाण्यावरील बुडबुडा आहे, जीवित क्षणभंगुर आहे, जगांत टिकणारें असें कांहींच नाही, सर्व वस्तु नकली आहेत, त्याना शाश्वती नाहीं, हें सर्व शून्य आहे, हा सर्व भास आहे, हा सर्व मुलामा आहे इत्यादि शिव्यानीं जगाचा अपमान करणारे तत्त्वज्ञ हे खरे तत्त्वज्ञच नाहींत. कारण ते जगाशी कधीं समरस झालेच नाहीत. हातांत कोणतेंही शस्त्र कधींही न घेत-लेल्यानें युद्ध करणें हें सरोस वाईट ठरवावें, कोणत्याही माडवाखालून चुकूनही न गेलेल्यानें स्त्री ही पुरुषाच्या मार्गांतील धोंड आहे असे म्हणावें, कोणत्याही क्रीडांगणावर कधींही न गेलेल्यानें खेळ खेळणे हे वाईट ठरवावे, ज्ञानाच आनंद काय आहे तो ज्याने अनुभविला नाही त्याने शिक्षणावर आक्षेप घ्यावेत त्याप्रमाणें ह्या तत्त्वज्ञांची स्थिति असते. जगापासून, व्यवहारापासून, संसारा-पासून दूर राहाणाऱ्या माणूसघाण्या लोकाचे हे उद्गार ऐकून जगाला तर वाईट वाटतेच, पण त्या ईश्वरालाही किती वाईट वाटत असेल! 'मी निर्माण केलेल्या सुंदर जगाविषयीं कृतघ्नपणानें असले उद्गार मनुष्यानें काढावेत ना?' असा विचार देवाच्या मनांत जरूर येत असेल.

खरोखरच विचार केला असता जगाला 'असार पसारा' म्हणण्याचें काय कारण आहे? जगात निरुपयोगी, व्यर्थ, फुकट, असें काय आहे? स्त्रीपुरुष, पशुपक्षी, कृमिकीटक इत्यादींनी गजबजलेल्या; वनस्पति, वृक्षवेली, फुलादिकानी नटलेल्या; महासागरांनीं वेष्टिलेल्या आणि चंद्रसूर्यांनी प्रकाशित केलेल्या ह्या जगांत असार आणि व्यर्थ काय आहे? येथील फुलांत सुगंध आहे आणि मधही आहे; वृक्षांच्या ठिकाणीं छाया आहे आणि औषधी गुण आहेत; महा-सागरांत मीठ आहे आणि रत्नेंही आहेत; सूर्यांत जीवनतेज आहे आणि चंद्रांत सुधाशांतिही आहे; स्त्रीपुरुषांच्या ठिकाणीं स्वार्थाबरोबर त्यागबुद्धिही आहे. आणि मग काय हवें आहे तुम्हांला कीं ज्याच्याकरितां जगाला असार आणि व्यर्थ म्हणून संबोधितां?

जगांत मृत्यु आहे, निरनिराळे रोग आहेत, स्वार्थ आहे, दांभिकपणा आहे, द्वेष आहे, अन्याय आहे, अनीति आहे, विषयांधता आहे, कुरूपपणा आहे, चंचलता आहे, अशाश्वति आहे आणि दारिद्र्य आहे, म्हणून का जगाला

असार आणि व्यर्थ म्हणायचें ? उलट ह्या वाईट गोष्टी असूनही जग टिकलें आहे, वाढतें आहे, अधिक सुंदर बनतें आहे, ह्याचा अर्थच असा कीं तें असार नसून सारयुक्त आहे, व्यर्थ नसून सार्थ आहे, शरीरांत रोगजंतु असूनही शरीर वाढत असेल तर तें सजीवतेचें लक्षण जसें वैद्य समजेल तसें जगांत वैगुण्य असूनही तें टिकत असेल तर तें जगाच्या दृष्टीनेंही चांगलें लक्षण समजलें पाहिजे. जगाची सुरुवात होऊन लक्षावधि वर्षें झालीं. पृथ्वीच्या पाठीवर कोट्यवधि स्त्रीपुरुष खेळले-बागडले, समुद्राच्या पाण्यांत असंख्य जीवांनीं क्रीडा केली, आकाशांत लाखों तारे उदयाला आले नि अस्ताला गेले—आणि चंद्रसूर्यांनीं ह्या गोष्टीला साक्ष दिली. जी गोष्ट इतके दिवस टिकली तिला बेशरमपणानें व्यर्थ आणि असार म्हणून कसें चालेल ?

जग असार नसून आपले विचार असार आहेत. जगात प्रत्यक्ष जे पडले आहेत, ज्यांनीं जगातील सुखदुःखें अनुभविलीं आहेत, जगाच्या आशा-आकांक्षांचा सहानुभूतिपूर्वक विचार केला आहे, ते कधींही असें म्हणणार नाहींत कीं सर्व खोटें आहे, असार आहे. आम्हांला अनेक जन्म मिळोत, आणि आमच्या हातून जगाची प्रगति होवो, सेवा होवो, असेंच ते म्हणतील. त्यांच्या मनांत हलके किंवा क्षुद्र विचार कधीं यायचेच नाहींत. कारण वैयक्तिक स्वार्थाची दृष्टि सोडून, कुठल्यातरी दूरच्या ध्येयावर त्यांनीं आपली नजर रोखलेली असते. तें उज्ज्वल ध्येय कधीं गांठतां येईल ह्याचा एकच विचार अहर्निश त्यांच्या मनांत असतो. ते जग सत्य मानतात, सुंदर मानतात, कल्याणकर मानतात; आणि म्हणूनच तसल्या जगाला अधिक सुंदर, अधिक सुखकर बनविण्याचा ते प्रयत्न करतात. असा प्रयत्न करीत असतांनाच त्यांच्यांतून कार्ल मार्क्स, लेनिन, स्टॅलिन ह्यांच्यासारख्या विभूति निर्माण होतात आणि इतरांना पटवून देतात कीं आळशी व स्वार्थी लोकांनीं जगाला व्यर्थ आणि असार म्हटलें तरी तें खरोखर असार नाहीं, आणि व्यर्थ तर नाहींच नाहीं.

# वरसंशोधनाची मोहीम

माझ्यावर असलेल्या कौटुंबिक जबाबदारींत एक जबाबदारी वरसंशोधनाची असल्यामुळें गेल्या वर्षी वसंतऋतु सुरू होऊन कोकिळांनीं पंचमालाप सुरू करतांच आमच्या घरांत लग्नविषयक प्रलाप निघूं लागले. माझें ह्या कामगिरी-कडे दुर्लक्ष होत आहे, पवित्र कर्तव्य मी बजावीत नाहीं, असें करून कसें चालेल, मुलीचें वय नाहीं का वाढत, इत्यादि स्वरूपाचीं कुजबुजणीं ऐकून व त्यांपासून घ्यायचा तो बोध घेऊन कॉलेजला उन्हाळयानिमित्त सुट्टी सुरू होतांच वरसंशोधनाच्या मोहिमेवर मी निघालों.

केवढें अवघड आहे हें कार्य ह्याची जाणीव मला मोहिमेवर निघेपर्यंत नव्हती. आणि उघडच आहे. कशी असावी मला त्याची जाणीव ? माझा आपला दिसतो तसा सरळ खाक्या असल्यानें मला वाटलें, स्वतःचें टिपूसही न पाडतां हिटलरनें ज्याप्रमाणें ऑस्ट्रिया काबीज केला त्याप्रमाणें घामाचा एक थेंबही न गाळता हां हां म्हणतां मी वर शोधून काढीन ! ह्याला दुसरें एक स्वानु-भवाचें कारण होतें. माझें ज्या वेळीं लग्न झालें त्या वेळीं मी इतक्या चांगुल-पणानें वागलों, कीं माझ्या श्वशुरांनीं त्या वेळीं माझी पाठ थोपटली. एकच मुलगी मीं पाहिली व पाहिली तिलाच मी मनांतून आपली म्हटलें ! ह्याचा अर्थ ती मुलगी रंभा-अप्सरेसारखी होती म्हणून मी 'होय' म्हणालों किंवा मीच इतका नालायक होतों की दुसऱ्या मुली मला सांगूनच आल्या नसत्या, असा नव्हता; तर माझ्या श्वशुरानीं म्हटल्याप्रमाणें मी सौजन्यानें ओतप्रोत भरलेला होतों, हेंच खरें. मला त्या वेळीं वाटलें व अजून वाटतें, कीं ही मुलगी पाहाणें म्हणजे काय बाजारांतील एखादा जिन्नस पाहाण्याजोगें आहे ? तर नाहीं. बराचसा यदृच्छेवर विश्वास टाकून कुलीन घराण्यांतील साधारण बऱ्या दिसणाऱ्या मुलीला बेलाशक 'हो' म्हणून टाकावें असें माझें फार पूर्वीपासून मत होतें आणि आहे. माझ्या ह्या विचारांमुळें आणि प्रत्यक्ष स्वतःच्या आचरणामुळें वरसंशोधन हें फार सोपें असावें असें मला वाटत असल्यास त्यांत कांहीं दोष आहे का ? पण तें अवघड आहे, फार फार अवघड आहे, असा मला अनुभव आला. त्यापासून पुष्कळच शिकायला सांपडलें. नव्हती ती अक्कल आली ! वयोमानानें येणारा शहाणपणा तरुण-

पणांतच आला! कांहीं ठोकताळे बांधतां आले; कांहीं विधायक सूचना करण्याची पात्रता आली आणि ह्याचसंबंधानें माझे विचार व अनुभव जाणत्या व नेणत्या वाचकांसमोर ह्यापुढें मांडीत आहे, तिकडे त्यांनीं कृपा करून अवधान द्यावें.

वरसंशोधन ह्याचा अर्थ उपवधू अशा तरुणांचें संशोधन. परंतु उपवधू असे बहुतेक सर्वच तरुण असतात. कॉलेजांत असतांना आणि कॉलेजांतून बाहेर पडल्यावर नित्याच्या व्यवसायानंतर तरुण कसले विचार करीत असतात ह्याचा आढावा काढल्यास ते मुलींचा म्हणा, वधूंचा म्हणा किंवा अशांचपैकीं कोणाचा तरी म्हणा, विचार करीत असलेले आपणाला आढळतील. ह्यांत कांहीं ते वावगें करतात असें मी तरी म्हणणार नाहीं. योग्य वयात योग्य तेंच ते करीत असतात. असा कांहीं ते विचार करतात म्हणून तर वरसंशोधनाच्या मोहिमेंत थोडें फार यश मिळविण्याची आमच्यासारख्यांना आशा असते.' यंदा विचार कर्तव्य नाही' हें उत्तर सर्वच तरुणांनी खड्या आवाजांत देण्याचें ठरविल्यास सर्व ग्रंथच आटोपला म्हणायचा! पण तसे तरुण शहाणे आहेत, समंजस आहेत. तात्पर्य, लग्नासंबंधीं विचार ते करतात ही आनंदाची गोष्ट आहे.

पण एवढ्यानेंच सर्व भागत नाहीं. लग्नाचा विचार करणाऱ्या तरुणांपैकीं सर्वांचाच आपल्याला उपयोग होईल असें नसते. तर त्यांत पुन्हा आपल्या मुलीला पतकरील अशा तरुणाची आपणाला निवड करायची असते. वर-संशोधन ह्याचा खरा अर्थ आपल्या मुलीला पसंत करील अशा उपवधू मुलाचें संशोधन! आणि खरी अडचण असते ती असा वीर पुरुष शोधून काढण्यांतच. धन्य ते पिते व पालक कीं जे अशा प्रकारच्या वरसंशोधनांत ताबडतोब यशस्वी होतात.

' सध्या आपण एका संक्रमणावस्थेंतून जातों आहोंत, ' असे उद्गार लांबट चेहरे करून गंभीर वाणीनें काढलेले पुष्कळ वक्त्यांच्या तोंडचे आपण ऐकत असतों. ते कित्येक वेळां कसे खरे असतात याचें प्रत्यंतर मला माझ्या वरसंशोधनाच्या मोहिमेंत आलें. कसें तें पाहा—

पूर्वीं ( म्हणजे रामाच्या काळीं नव्हे ) ज्या वेळीं बालविवाह रूढ होते त्या वेळीं कुलीनाच्या घरची मुलगी सांगून आली कीं तिला नकार द्यायचा

नाहीं, हा सदाचार आणि सद्विचार समजला जाई. मुलीची व मुलाची परीक्षा वडीलधाऱ्या मंडळींकडून होई. ह्या परीक्षेंत रूपापेक्षां गुणांनाच अधिक किंमत देण्यांत येई. ह्या बाबतीत एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. माझी एक मावशी अशाच एका मुलीला पाहायला गेली असतांना तिनें ती मुलगी आपण पास केल्याचें सांगितलें. आम्हीं विचारलें, "कशावर पास केलीस ती मुलगी ?" तिनें सांगितलें, "कशावर म्हणजे ? काय सांगूं त्या मुलीची योग्यता ! सकाळीं उठून तिनें टोपलीभर शेणाच्या गोवऱ्या थापल्या, दहा जणाचा स्वयंपाक केला आणि तो देखील निगुतीनें." "पण दिसायला कशी आहे ?" आम्हीं विचारलें. "आहे दहाजणींसारखी. दिसण्याशीं काय करायचं आहे ?" मावशीनें उत्तर दिलें.

तात्पर्य, ज्या वेळीं मोठीं माणसें मुली पाहायल्या जात त्या वेळीं सौंदर्यापेक्षां उपयुक्ततेवरच अधिक भर दिला जाई आणि त्यामुळें मुली लवकर पसंत केल्या जात. ह्याच्या उलट ज्या समाजांत प्रेमविवाह रूढ आहेत त्या समाजांतील पोरी पोरांच्याभोवतीं असें मजेशीर जाळें पसरून ठेवतात, कीं त्यांत ते सांपडलेच पाहिजेत. सध्या आपल्या समाजांत, धड नाहींत पूर्वीच्या पद्धतीचे विवाह की धड नाहींत पाश्चात्य समाजांतील प्रीतिविवाह ! त्यामुळें मुलें, मुली व पालक ह्यांची फारच कुचंबणा होत आहे. आणि ह्या दृष्टीनें पाहातां आपण एका संक्रमणावस्थेंतून जात आहोंत असें मलाही म्हणावेसें वाटतें. संक्रमणावस्था म्हटली म्हणजे तींत गोंधळ, अव्यवस्था, मनस्ताप, चिंता, हानि इत्यादि गोष्टी असायच्याच आणि ह्यापैकीं प्रत्येक गोष्टीचा मला थोडा फार अनुभव मीं काढलेल्या मोहिमेंत आला.

वरसंशोधनाचा हेतु मनांत बाळगून (पण तो बाहेर कोठें न कळवितां) कांहीं गावांतलेच तरुण मीं हेरून ठेवले होते. मनांत असा विचार करीत होतों, कीं झाडांना चैत्रपालवी फुटून हे तरुण जरा रंगांत येतांच त्यांना लग्नासंबंधीं विचारूं. पण ज्या वेळीं मी त्यांना प्रत्यक्ष विचारायला म्हणून गेलों त्या वेळीं सुट्टीनिमित्तानें व परीक्षेच्या निमित्तानें ते सर्व महाभाग गांव सोडून गेल्याचें माझ्या ध्यानीं आलें ! त्या वेळीं मला काय वाटलें असेल ह्याचा विचार जाणते वाचक सहज करूं शकतील !

## वरसंशोधनाची मोहीम

पण तेवढ्यानें नाउमेद न होतां मीं मध्यप्रांत गांठण्याचें ठरविलें. तिकडचे लोक जरा भोळसर म्हणजे उदार मनाचे व खाऊन पिऊन सुखी असतात असें एका मित्रानें सांगितल्यावरून मीं सरळ मध्यप्रांताची राजधानी–नागपूर हें शहर–गांठलें. माझ्या मित्रानें कांहीं स्थळांचीं नांवें आणि पत्तेही माझ्याजवळ कृपावंत होऊन देऊन ठेवले होते. त्यामुळें माझ्या पायांत एक प्रकारची धमक उत्पन्न झाली होती. नागपूर येथें मीं माझा मुक्काम एका प्रसिद्ध वकिलाच्या घरीं ठेवला होता. त्याला माझा मनोदय कळवून आणि त्याच्यापुढें माझ्याजवळ असलेलीं नांवें ठेवून मी म्हणालों, "उद्यां सकाळपासून मी माझा मोर्चा सुरू करतों. ह्या पंचवीस नांवांपैकीं एखादं तरी स्थळ हातीं लागल्यावांचून कसं राहील? चांगले लोक दिसताहेत हे सर्व. कुणी वकील आहेत तर कुणी डॉक्टर आहेत तर कुणी प्रोफेसर आहेत! असल्या सज्जनांचा मेळा ह्या शहरांत जमलेला पाहून कुणाला बरं धन्यता वाटणार नाहीं?" त्यावर माझा मित्र म्हणाला, "तें खरं; पण अगोदर तुमच्या गोत्राशीं ह्या स्थळांचीं गोत्रं जमतात कीं नाहीं हें नको का बघायला?" "आमच्या बडोद्यांतील कायद्याप्रमाणें गोत्रप्रवर बघावं लागत नाहीं" मी माझी बाजू सावरण्याच्या उद्देशानें म्हणालों. "तेवढी सुधारणा इकडे अजून झाली नाहीं!" माझा मित्र म्हणाला.

"तरीच तुमच्या प्रांताला मागासलेला प्रांत म्हणतात." मी कुचाळीच्या स्वरानें म्हणालों.

"तें कांहीं म्हणा," माझ्या अज्ञानाची कींव करीत माझा वकील मित्र म्हणाला, "पण तुम्हांला गोत्रविचार अगोदर केलाच पाहिजे."

"बरं आहे." मी म्हणालों.

"तुमचं–म्हणजे ज्या तुमच्या नातेवाईक मुलीचं लग्न व्हायचं आहे तिचं गोत्र काय?"

"आतां तें मी काय सांगणार?" मी म्हणालों.

"आडनांव तुम्हांला माहीत आहे?" मित्रानें विचारलें.

अर्थात् आडनांव मला माहीत होतेंच. त्यावरून पंचांग पाहून मुलीचें गोत्र आम्हीं शोधून काढलें. त्याच पंचांगावरून माझ्याजवळ असलेल्या स्थळांचीं गोत्रें शोधून काढण्यांत आलीं. कोणत्या गोत्राचें कोणत्या गोत्राशीं पटत नाहीं ह्याचेंही कोष्टक पंचांगांत दिलेलें पाहून पंचांगाविषयीं माझा आदर दुणावला. परंतु लवकरच असें आढळून आलें, कीं माझ्याजवळ असलेल्या यादीतील सर्वच स्थळें शांडिल्य आणि काश्यप गोत्रीय असल्यानें त्यांचें आमच्या शांडिल्य गोत्राशीं मुळींच जमत नाहीं! ज्या यादीवर मी उड्या मारीत होतों ती एका क्षणांत कुचकामाची ठरविणाऱ्या पंचांगाचा मला मनापासून राग आला. झालें! मी मटकन् खालीच बसलों! बडोद्यांतील माझ्या मित्रानें मला दूर देशांत फजीत करण्याकरितांच असलीं निरुपयोगी स्थळें सुचविलीं असतील ह्याविषयीं मला शंका राहिली नाही. असा त्या मित्राचा राग आला त्या वेळीं! पण काय उपाय? म्हणून हतबुद्ध होऊन कांहीं वेळ स्वस्थ बसलों.

मला स्वस्थ बसलेला पाहून माझा वकील मित्र म्हणाला "थेट अर्जुना-सारखा हतबुद्ध होऊन बसला आहेस! अरे, असं डरून कसं चालेल? निष्काम अंतःकरणानें कर्म करणाऱ्या मनुष्याला यश मिळालंच पाहिजे."

"तेवढी एक गोष्ट खरी आहे. ह्या वरसंशोधनांत माझा स्वार्थ असा कांहीच नाहीं." मी म्हणालों.

"केलेली मेहनत फुकट जाऊं नये म्हणून प्रथम गोत्र विचारल्यावांचून आतां पुढचं पाऊल टाकत जाऊं नकोस. गोत्र अनुकूल, म्हणजे तुझ्या बाबतींत शांडिल्य व काश्यप ह्यांखेरीज असल्यास मग पुढच्या चवकशा करीत जा."

मित्राचा हा योग्य सल्ला मिळाल्यानंतर त्या दिवसापासून मी जो कोणी तरुण भेटेल त्याला "आपलं गोत्र काय?" म्हणून विचारूं लागलों. माझ्यासारख्याच्या तोंडून ही चौकशी होत असल्यानें तिच्यापासून कांहीं हास्यनिर्मिती होत असेल ह्याची मात्र मला जाणीव नव्हती. पुढें पुढें ही गोष्ट माझ्या ध्यानांत आली. मी पुढें चालूं लागल्यावर माझ्या मागें हास्यकल्लोळ उडूं लागले! पण सत्कार्याला प्रवृत्त झालेल्या मला त्याचें काय होय! ह्या

बाबतींत सुरवातीला मात्र गंमत होऊं लागली. आपलं गोत्र काय ?" असा प्रश्न करतांच "शांडिल्य" असें उत्तर आल्यास आंतून जिरल्यासारखा होऊनही मी अशी संपादणी करूं लागलों, "वाहवा ! आनंद झाला आपलं गोत्र ऐकून ! एकाच गोत्राच्या माणसाला भेटण्यात जो कांही आनंद आहे, तो पुसूं नका. बडोद्याला कधीं आलांत तर अवश्य या गरिबाच्या घरी.

ह्याच्या उलट भारद्वाज, अत्रि, वासिष्ठ, जामदग्न्य इत्यादि गोत्रांचीं नांवें कानावर पडताच माझे डोळे समाधानानें प्रफुल्लित दिसत. त्या त्या गोत्रजांशीं मग माझ्या अघळपघळ खूप गप्पा होत. त्यांना हॉटेलांत किंवा बगीचात नेऊन त्याची सरबराई करण्यात माझ्या खिशाला रोज रुपया दोन रुपयांचा भुर्दंड पडे ! आणि शेवटीं उत्तर ऐकावें लागे तें अशा प्रकारचें— "आपलं म्हणणं सर्व ठीक आहे; पण यंदा आम्हांला कर्तव्य नाही. मोठ्या भावाचं अजून लग्न व्हायचं आहे. धाकटी बहीण अजून लग्नाची आहे. आमचं अजून नीट बस्तान बसलं नाही."

पुढेंपुढें तर असल्या गप्पाही अशक्य झाल्या. माझ्या कार्याचें स्वरूप गांवांतील सर्व तरुणांना कळल्यामुळें "आपलं गोत्र काय ?" ह्या माझ्या सवालाला "आमचं लग्न झालं आहे" असें खडें उत्तर येऊं लागलें !

माझ्या मित्राला ही हकीगत सागताच तो म्हणाला, "आतां असा प्रयत्न न करतां दुसऱ्या तऱ्हेनें केला पाहिजे. आमच्या प्रांताला मागासलेला प्रांत तुम्ही म्हणालात तरी कित्येक बाबतीत आम्हीच नव्या योजना लोकांसमोर प्रथम माडतों. विवाह-मंडळाची कल्पना ह्या आमच्या शहरांतलीच. ह्या मंडळाला सुरू होऊन चार पांच वर्षे झालीं. मंडळांत लग्नाला योग्य अशा वधूवराची माहिती एकत्र केलेली असते. मी म्हणतों ह्या माहितीचा आपण का न उपयोग करून घ्या ? आजच मंडळाचे चिटणीस मला वाटेत भेटले होते. लागल्यास त्यांच्याकडून अर्जाचे कागदही मागवून घेतां येतील."

"कांहीं हरकत नाही. माझी आणि चिटणिसांची एकदा गाठ घालून दे म्हणजे पुढचं मी पाहून घेईन. कुणीकडून तरी लग्न जमवायचं हा माझा हेतु आहे. अमुकच मार्गानें वरसंशोधन करायचं नि अमुक मार्गानें नाहीं, असला हट्ट माझा तरी निदान नाहीं." मी म्हणालों. आणि मग दुसऱ्याच दिवशीं

तेथील एका विवाह-मंडळांत आम्ही गेलों. त्या मंडळात शिरतांना, कां कुणास ठाऊक, पण मला जरा संकोच वाटूं लागला. पण कोणतेंही कृत्य करताना सुरवातीला असा संकोच वाटायचाच असे मनाशी ठरवून मी माझ्या मित्रासमवेत मंडळाचे मुख्य अधिकारी ह्याच्याकडे गेलों. तेथे गेल्यावर 'रेल्वे मेल सर्व्हिस'च्या कचेरीत गेल्यासारखें मला वाटलें. वसिष्ठ, विश्वामित्र, जमदग्नि, अत्रि, अंगिरस, शांडिल्य, काश्यप इत्यादि ऋषि स्वर्गातून त्या कचेरीत आल्यासारखे दिसत होते. प्रत्येक ऋषीच्या नावाचा एकेक खण असून त्यात त्याच्या कुटुंबांतील विवाहाला योग्य अशा वधूवराचे माहितीचे तक्ते ठेवलेले होते. वेदकालीन आमचे ऋषि मेले नसून आपल्या पुत्रपौत्राच्या रूपाने अजून कसे जिवंत आहेत ह्याची खात्री ह्या कचेरीत मला पटली. कचेरीतील कांही कारकून निरनिराळे तक्ते आपल्या समोर ठेवून वधूवराची काल्पनिक जुळवणी करीत बसलेले होते; तर कांहीं आलेल्या पालकाना आणि वधूवराना योग्य तो सल्ला आणि माहिती देत होते. मंडळाच्या मुख्याधिकाऱ्यानें माझ्याकडून योग्य ती फी व योग्य ती माहिती लिहून घेऊन शांडिल्य गोत्राला जुळतील अशा वराच्या तक्त्याचा डोंगर माझ्यासमोर उभा केला ! ह्या डोंगराच्या पोटांतून आपणाला हवें असलेलें वररत्न सहज आपण शोधून काढूं ह्या जाणिवेनें मला आनंद झाला आणि मी माझ्या वकील मित्राला आपल्या कामाला जाण्यास सांगितलें.

मित्र गेल्यावर त्या ढिगाऱ्यातून वररत्न शोधून काढणें अगदी सोपें नाही ह्याचा मला अनुभव आला. कारण माझ्या दृष्टीने योग्य अशा वरांची यादी तयार करायला मला पुरते दोन दिवस लागले. प्रत्येक वर स्वतःला मदनाचा अवतार समजून साक्षात् रतीची अपेक्षा करीत असलेला आढळला. जगांत जेवढें म्हणून काही चांगलें असेल तेवढ्या सर्वांची प्राप्ति लग्नाच्या प्रसंगीं आपणाला व्हावी अशी मनापासूनची इच्छा बहुतेक वराची आढळली. मात्र असें करतांना आपली त्याला लायकी आहे किंवा नाही इकडे कोणीच लक्ष देत असलेला दिसेना ! कसें तें खालील नमुन्यादाखलच्या तक्त्यावरून आढळेल.

**१ वरांविषयीं माहिती**

मॅट्रिक, रूप साधारण, खाजगी धंदा, सालिना उत्पन्न ३०० रुपये, वय वर्षे २४.

**वधूकडून अपेक्षा**

एक हजार रुपये हुंडा, हुंडा नसल्यास वधू सुस्वरूप व निरोगी असावी, वर्षांतून आठ महिने माहेरीं राहाण्याची तयारी असावी. वधूचें वय १८ असावें.

**२ वराविषयीं माहिती**

शिक्षण मॅट्रिकपर्यंत, रूपानें सुंदर; कलाप्रिय, धंदा अजून निश्चित नाहीं, पण कर्तबगार, वय वर्षें २३.

**वधूकडून अपेक्षा**

वधू देखणी असावी, पालकांनीं वराला विलायतेंत कलाशिक्षणाकरितां जाण्यास सुलभ जाईल इतका हुंडा निदान द्यावा, वधू कलाप्रिय असावी, जातीची अट नाही. वय १७ असावें.

**३ वराविषयीं माहिती**

सुदृढ, निरोगी, कारखानदार, सालिना उत्पन्न पांच हजार. वय वर्षें ३५.

**वधूकडून अपेक्षा**

वधू निरोगी, गृहकृत्यात दक्ष, मनमिळाऊ असावी. हुंड्याची अट नाही. पण कारखान्याला मदत पालकांनी करावी. वधूचें वय २० पेक्षां अधिक असावें.

**४ वराविषयीं माहिती**

शिक्षण बी. एस्‌सी. पुढें अभ्यास सुरू, रूपानें मध्यम, संगीताची आवड, सालिना उत्पन्न ९०० रुपये. शाळा-खात्यांत नोकरी, वय वर्षें २७.

**वधूकडून अपेक्षा**

वधू बी. ए. असावी, रूपानें ती सुंदर व सडपातळ असावी, तिचा वर्ण केतकीप्रमाणें असावा, स्विमिंग, सिंगिंग, ड्रॉईंग तिला यावे; ती कुलीन आणि सद्‌गुणी असावी, पतीबरोबर सहकार्य करण्याची तयारी असावी. हुंडा तीन हजार. पण विशेष हट्ट नाहीं. वय पंचवीसच्या आंत असावें.

तात्पर्य, अशा प्रकारच्या महत्त्वाकांक्षी तक्त्यांतून मला पाहिजे तसा वर शोधून काढणेंच कठीण होतें. तरीसुद्धा चालकांच्या सांगण्यावरून कांहीं तक्ते मी पसंत केले. तक्त्यातील वर बहुतेक खुद्द नागपूर येथील असल्यानें लवकरच त्यांना मुलगी दाखविण्याची सोयही मला करावी लागली. हाच प्रकार मुंबई व पुणें ह्या दोन शहरांत सदरहू मंडळाच्या मध्यस्थीनें व इतर रीतीनें मला करावा लागला. मुलगी दाखविण्याचा प्रकार असभ्य नसला तरीही इतका वाईट मी समजतों, कीं इतर कांहीं मार्ग मला सापडला असता तर ह्या रानटी प्रकाराचा मीं मुळीच अवलंब केला नसता. पण अफ़्सोस्! दुसरा कांहीच इलाज नसल्यानें ह्या हीन मार्गाचा अवलंब मला करावा लागला. अगदीं अनोळखी मनुष्याला मुलगी दाखविणें हें किती अकाव्यमय आहे हें वाचक ओळखतीलच. शिवाय खुद्द मुलीला त्या प्रसंगीं काय वाटत असेल ह्याची कल्पना, जावें तिच्या ठायी तेव्हा कळे! पण आमची मुलगी मोठी समंजस. ती ह्या दिवसांतून यशस्वीपणानें बाहेर पडली. पण तत्पूर्वी आम्हांला जो अनुभव आला तो सागण्याजोगा आहे.

एक गृहस्थ आपल्या घरांतील सर्व नातेवाईक आणि खुद्द मुलगा अशांना घेऊन मुलगी पाहायला आले. हसतमुखानें मीं त्यांचें स्वागत केलें आणि त्यांच्यासमोर चहाचे कप आणून ठेवले. आमच्या मुलीनें त्यांना सर्वांना नमस्कार केला आणि ती एका खुर्चीवर बसली. खुद्द मुलानें व त्या गृहस्थानें मुलीला काहीं प्रश्न विचारले. त्याची तिनें ताबडतोब उत्तरें दिलीं. ती ऐकून तिच्या यशाविषयी मला आशा वाटूं लागली. पण दुसऱ्या दिवशीं त्या गृहस्थाकडून निरोप आला, "इतकी हुशार मुलगी आमच्या मोठ्या कुटुंबांत शोभणार नाहीं!"

दुसरे गृहस्थ मुलाला घेऊन न येतां आपल्या बायकोलाच फक्त घेऊन आले होते. हसून व त्यांना चहा देऊन मीं त्यांचें दोघांचें स्वागत केलें. त्यांनीं मुलीला पाहिलें. कांहीं प्रश्न विचारले. दुसऱ्या दिवशीं त्यांजकडून निरोप आला—"आमचा मुलगा किरकोळ आहे. त्याला तुमची मुलगी फार लठ्ठ होईल!"

तिसरे गृहस्थ स्वतः उपवधू असे होते. त्यांनी मुलगी पाहिली. तिच्याशीं विचारविनिमय केला; पण दुसऱ्या दिवशीं कळविलें, " मुलीची उंची एका इंचानें कमी आहे ! "

चौथ्या गृहस्थांना आमची मुलगी आणि आम्ही सर्व पसंत, म्हणजे पूर्ण पसंत पडलों. पण ते म्हणाले, " एक सहा महिने तुम्ही वाट पाहाल तर बरं होईल. " मी म्हणालों, " तुम्ही लग्न ठरवून ठेवीत असाल तर वर्षभरही आम्ही थाबूं. " ह्या गोष्टीला त्यांची तयारी न दिसल्यानें माझी निराशाच झाली !

पाचवे गृहस्थ मुलगी पाहून गेल्यावर त्याच्या मित्राकडून निरोप आला तो असा, " मुलगी बरी आहे. पण आजच आम्ही कांही सागूं शकत नाही. आणखी पुष्कळ मुली सांगून आल्या आहेत. त्या पाहून झाल्यावर मग काही निश्चित सागतां येईल. पण आमच्यावर तुम्ही विसंबून राहूं नका. "

सहावे गृहस्थ म्हणाले, " आपण पाच हजार रुपये हुंडा देणार असलात तर मी मुलगी पाह्यला येतों. नाहीतर नाहीं. " मीही मग म्हणालों, " आपली लायकी समजली. आमची मुलगी तर आम्ही तुम्हांला नाहीच दाखवीत; पण कोणताही समंजस पालक तुम्हांला आपली मुलगी दाखविणार नाही, असा मी शाप देतों. "

सातवे गृहस्थ जरा विचित्रच आढळले ! त्याना भेटायला गेलो तेव्हां लग्नाचा मुलगा त्याच्या समोरच्याच खुर्चीवर बसला होता. त्याला एक शब्दही बोलं न देता ते मला म्हणाले, " तुमच्या मुलीनें सासूसासऱ्याचं ऐकलं पाहिजे, म्हणजे त्याना सर्वस्वी सुख दिलं पाहिजे. कायावाचामनाने देखील तिनें त्याना दुखवितां उपयोगी नाही. एक वेळ तिनें नवऱ्याचं नाही ऐकलं तरी चालेल; पण आमचं ऐकलं पाहिजे. पाहातांच आहात तुम्ही आमचा मुलगा माझं बोलणं कसं बिनबोभाट ऐकून घेत आहे ते ! दुसरं जरा नाजूक प्रकरण आहे. इकडे कान करा. आमच्या मुलाची मध्यरात्रीच्या सुमारास मधून मधून ज्ञानसमाधि लागत असते. तुम्हांला इतकंच सागायचं, कीं अशा वेळी तुमच्या मुलीनें त्याला त्रास देऊं नये. माझं बोलणं आलं असेल तुमच्या लक्षांत. माझा मुलगा ज्ञानयोगी आहे. "

हें ऐकून मी म्हणालों, “ फार आनंदाची गोष्ट आहे. असल्या ज्ञान-योग्याचा संसार थाटून देण्याचं पाप आपण करण्याऐवजीं त्याला आपण संन्यास देऊन पुण्य पदरीं जोडाल तर तें समाजाच्या दृष्टीनें अधिक चांगलं होईल ! ”

स्थळांच्या बाबतीतही माझा अनुभव असा आहे, कीं मुंबई व वऱ्हाड-नागपूर ह्याच बाजूला चागली ‘ स्थळें ’ आहेत. एके काळी पालक लग्नाच्या मोसमांत पुणें मुक्कामी जाऊन तळ देत आणि वर-संशोधनाचा खेळ खेळत. त्या दृष्टीनें पाहाता आज पुणें अगदीं भिकार बनलें आहे. निदान ब्राह्मणाचीं स्थळें तरी अगदी फासकट-फुसकट स्वरूपाचीं मला पुण्यात आढळलीं. कुठें ते पेशवाईकालीन ऐश्वर्यवान् ब्राह्मण आणि कुठें आजचे तेली, तांबोळी, शिंपी, गवळी, कापडकरी, भुसारी ह्यांचे वंशज ब्राह्मण ! स्वर्गातील वसिष्ठ-विश्वामित्रादि ऋषींना आपल्या वंशजांची अवनति कशी बघवते, कुणास ठाऊक ? किंवा ‘ आप मरे पीछे डूब गयी दुनिया ’ ह्या म्हणीप्रमाणें त्या गोष्टीचा ते विचारही करीत नसावेत. ब्राह्मणांना सरकारी नोकऱ्या मिळेनाशा झाल्यापासून त्यांनीं वैश्यवृत्ति स्वीकारली हें मला माहीत आहे; पण वरसंशोधनाच्या मोहिमेवर निघालेल्या मला जी अडचण भासली तेवढीच मीं येथें नमूद केली. पुण्य-नगरींत मी मोठ्या आशेनें गेलो होतों; पण माझी सर्वस्वीं निराशा झाली !

वरसंशोधनाच्या बाबतींत मला आलेल्या अनुभवांवरून कांहीं सूचना कराव्याशा वाटतात त्या पुढीलप्रमाणें होत—

मुलगी पाहाण्याची आपली जी पद्धति आहे ती शक्य तितक्या लवकर बदलावी. मुलीच्या पित्यानें वा पालकानें आपल्या माहितीच्या तरुण मुलांना आपल्या मुलाकडे खेळण्याच्या निमित्तानें किंवा अन्य काही कारणानें बोलवावें. अशा तऱ्हेनें तरुण जमले असतांना साहजिकच त्याची व घरांतील मुलींची कांहीं काळानें ओळख होईल आणि मग मुलींना, अगर मुलांना किंवा पाल-कांना योग्य वाटल्यास त्यानीं लग्न करण्याच्या दृष्टीनें पुढील प्रयत्न करावेत. भावांनीं आपल्या बहिणींकरितां, बहिणीनीं आपल्या भावांकरितां, मित्रांनीं आपल्या मैत्रिणींकरितां मी म्हणतों ह्या दिशेनें प्रयत्न करायला काय हरकत आहे ? ओळखीच्या पोटीं मैत्री, मैत्रीच्या पोटीं स्नेह, स्नेहाच्या पोटी जम-ल्यास विवाह अशा तऱ्हेनें हे प्रश्न सोडविल्यास किती चांगलें दिसेल बरें !

ज्या समाजांत प्रीतिविवाह रूढ आहेत ते देखील असले प्रयत्न मोठ्या प्रमाणावर करतात. मग प्रीतिविवाहाकडे जाण्याची एक पायरी ह्या दृष्टीनें आपल्या समाजातही लग्न जमविण्याचा हा सभ्य प्रकार अमलांत आणायला काय हरकत आहे ? ज्या गावात सजातीय किंवा सारख्या आवडीनिवडीची मुलेंच नाहींत अशा ठिकाणी थोडेसें जड जाईल. पण मोठाल्या शहरातून हा प्रयोग ताबडतोब करून पाहाण्याजोगा आहे असें माझ्या अल्पमतीला व बहुमतीलाही वाटतें. पाश्चात्य समाजातही पालकांची मदत लग्न जुळविण्याच्या कामी थोडीफार घेतली जातेच. तेव्हां आपल्याइकडील मुलांमुलीना असली कांहीं मदत केल्यास त्याना ती नकोशी होईल असें मानण्याचें काहींच कारण नाहीं. मी म्हणतों तशा प्रकारें लग्नें जुळविण्यात आल्यास हुंड्याचा जाचही अगदी कमी होऊन जाईल. अनोळखी माणसाकडून हुंडा जसा टिच्चून मागता येतो तसा स्नेहाच्या माणसांकडून मागितला जाणार नाहीं आणि अनायासें ह्या पद्धतीनें केवढी मोठी सुधारणा केल्याचें श्रेय पदरीं पडेल.

ह्या पद्धतीचा अवलंब दुसऱ्याही एका कारणास्तव करण्याजोगा आहे. मुलगी पाहाण्याच्या आपल्या रूढ पद्धतीत मुलीच्या अंगीं असलेल्या चागल्या गुणाची क्वचित् पारख होते. अगदी सुस्वरूप मुली ताबडतोब पसंतीस उतरतात हें खरें; पण मध्यम स्वरूपाच्या मुली नजरेत भरतच नाहीत. कारण ज्या वेळीं त्याना 'पाहायला' म्हणून लोक येतात त्या वेळी त्या घाबरून गेलेल्या असतात. त्याचे मन काही त्या वेळी प्रसन्न नसतें. अशा स्थितीत त्यांच्या ठिकाणीं असलेल्या चांगल्या गोष्टी उघडकीस येणार कशा ? मी सांगतो त्या पद्धतीत मुलीच्या मनावर बाहेरून कोणत्याही प्रकारचें वजन न पडल्याने त्या खरोखरी जशा असतील तशाच दिसतील. आणि माझी खात्री आहे, की काहीं थोड्या अपवादांदाखल अगदीं कुरूप अशा मुली सोडल्यास प्रत्येक मुलीच्या ठिकाणी आकर्षक असें कांहीं ना कांही असतेंच. एखादीचें बोलणे मधुर असेल तर एखादीच्या पाहाण्यांत साऱ्या विश्वाचे सौंदर्य भरलेलें दिसेल, तर तिसरीचा केशभार मोहक असेल, तर चौथीची चाल पाहाणाऱ्याचें हृदय आकर्षून घेईल अशी असेल, तर पांचवीचा स्वभाव अमृताप्रमाणें असेल – अशा एक कीं दोन, शेंकडों गोष्टी आहेत आणि त्यांपैकीं प्रत्येक मुलीच्या वांट्याला

कांहींना कांहीं तरी आलेल्याच असतात. निसर्गानें दिलेल्या ह्या देणग्या मुलींच्या सहवासांत आल्यावांचून कळूं शकत नाहीत. मी म्हणतो त्या पद्धतीनें विवाह जमविण्यांत आल्यास एरवी नापास ठरणाऱ्या मुलीही पास होण्याचें केवढें मोठें क्षेत्र वाढेल ! आणि मग एका कवीनें म्हटल्याप्रमाणें 'सहज कशी खेळविते ललना ' ह्या युक्तीची सार्थता आपणाला पटूं लागेल. पण हा दिवस केव्हां उगवणार आहे कुणाला ठाऊक !

उपवधू अशा मुलानाही एक सूचना करावीशी वाटते. मुली 'पाहातांना' त्यानीं फार फार चिकित्सा करूं नये. आखूडशिंगी, अल्पमोली, बहुदुधी अशी गाय कुठल्याशा गोष्टीतल्या ब्राह्मणाला जशी मिळाली नाहीं त्याच-प्रमाणें काव्यात वर्णन केलेल्या व काल्पनिक स्वर्गात असलेल्या रंभा-उर्वशीही त्याना क्वचितच मिळणें शक्य आहे. नाक थोडें लांब आहे, डोळे थोडे मोठे आहेत, जरा जास्त गोरेपणा आहे, उंची थोडी जास्त आहे, बोलणें जरा कठोर आहे, मान जरा कलती आहे, बोटें जरा आखूड आहेत—अशा प्रकारची टीका करण्याची संवय लागली म्हणजे तीच पुढें घातुक ठरते. लग्न झालेल्या बायकांकडे ह्या तरुणानी एकदा बघावें अशी माझी त्यांना सूचना आहे. त्या स्त्रियापैकीं शेंकडा नव्याण्णव अगदीं सामान्य असलेल्या त्यांना आढळतील. तेव्हा रूपाच्या बाबतींत आपल्या समाजात हेंच प्रमाण आहे असें समजून त्यानीं कुरूप नसलेल्या मुलीशीं बेलाशक लग्न करण्याची हिमत दाखवावी. घरातल्या बहिणींकडे आणि इतर आप्त स्त्रियांकडेही त्यानी बघावें. त्याही त्यांना सामान्यच असलेल्या आढळतील. घरात सामान्य स्त्रिया असतांना, बाहेर सामान्यच स्त्रिया दिसत असताना लग्न करायला निघालेल्या तरुणानें असामान्य स्त्रीची अपेक्षा करणें म्हणजे महाराष्ट्राचें काश्मिरांत रूपांतर करण्याइतकेंच हास्यास्पद आहे.

उपवर अशा मुलींना दोन शब्द सांगावेसे वाटतात. उपवर मुलींत डिग्री मिळविलेल्या व पंचविशीच्या पुढें गेलेल्या आणि डिग्री न मिळविलेल्या आणि विशींच्या आंत असलेल्या अशा दोन प्रकारच्या मुली असतात. पहिल्या प्रकारच्या बायांना किंवा प्रौढ मुलींना फारसे काही सांगावें लागत नाहीं. त्या त्यांच्या प्रकारें वरसंशोधन करीतच असतात. त्यांना मी इतकेंच

सांगेन, कीं लक्ष्मीधर मिळविण्याचा ह्व्यास न करतांना त्यांनीं सामान्यपणें सुशिक्षित व मिळवता असा आयुष्याचा जोडीदार शोधून काढावा.

दुसऱ्या प्रकारच्या मुलींना मात्र थोडासा उपदेश करावासा वाटतो. त्यांनीं चणचणीतपणा, बहुश्रुतता आणि गृहकृत्यदक्षता हे गुण संपादण्याचा खूप प्रयत्न करावा. मला जो तरुणाचा अनुभव आला आहे त्यावरून मी असें (डाव्या छातीवर उजवा हात ठेवून) सागूं शकतों, की त्यांना अलीकडे सुंदर मुलीं-पेक्षा चणचणीत, तरतरीत किंवा 'स्मार्ट' मुलीच अधिक आवडूं लागल्या आहेत. 'स्मार्टनेस'मध्ये कितीतरी गुणांचा अंतर्भाव होतो. बोलण्यात हुशारी, चालण्यांत तरतरी, स्वभावात गोडी, दिसण्यात माधुरी– तात्पर्य, सौदामिनीच्या ठिकाणी जी चमक व तल्लखता दिसते तसली चमक व तल्लखपणा असलेल्या पोरी हल्लीं पोराना फार आवडतात. चाफेकळीसारख्या नाकाला आणि हरिणी-सारख्या डोळ्यांना आजकाल जितका भाव नाहीं तितका भाव 'स्मार्टनेसला' येऊं लागला आहे. तेव्हा तरतरीतपणा अंगीं बाणेल असा प्रयत्न मुलीनीं आतां करावा. दुसरें, बहुश्रुतता हा गुणही त्यानीं वाचनाचा व्यासंग वाढवून अंगीं आणावा.

सध्याच्या धकाधकीच्या मामल्यात साधेपणाला (म्हणजे बावळेपणाला) काडीइतकी किमत नाही. मुलींनी चौकस झालें पाहिजे आणि त्याकरिता निर-निराळ्या विषयासंबधी पुस्तकें वा मासिकें वाचून माहिती मिळविली पाहिजे. आपल्या भावि पतीबरोबर त्याना विचारविनिमय करतां आला पाहिजे. तिसरा गुण म्हणजे गृहकृत्यदक्षता. स्त्रीचें स्त्रीत्व ह्या गुणांतच सामावलेलें आहे. उत्तम स्वयंपाक, पाहुण्याचें आदरातिथ्य, घरात सुव्यवस्था हीं ज्या स्त्रीला साधतात तिला पतीची मर्जी अन्य तऱ्हेनें प्रसन्न करण्याची जरुरीच नसते.

स्त्रियांनी वादविवाद केलेला, समाजांत पुढाकार घेतलेला मला जितका आवडतो त्याहीपेक्षां सुगृहिणी म्हणून त्यांनीं यशस्वी झालेलें मला अधिक पसंत पडते. आणि मला वाटतें, सामान्यपणें सर्व पुरुषाची हीच दृष्टि असावी. तेव्हा ज्या मुलीना आपलें योग्य वेळीं व योग्य वयांत लग्न व्हावेसें वाटत असेल (आणि अशाच मुलींचा भरणा जास्त असतो) त्यानीं वर सागितलेले गुण मिळविण्याचा मनापासून प्रयत्न करावा. इटकून गुण येईल. न आल्यास प्रस्तुत लेखकाच्या नांवानें बोटें मोडण्याचा अधिकार मी त्यांना देऊन ठेवतों.

पंचवीस वर्षांनंतर

# आव्हान

मनुष्याचे खरे स्वत्व केव्हां प्रकट होतें असे जर कोणीं आपणाला विचारलें तर आपण काय उत्तर द्याल ? आपण म्हणाल, हा फारच सोपा प्रश्न आहे. मनुष्य जेव्हा पूर्ण समाधानाच्या वृत्तीत असेल, जेव्हा त्याला कोणत्याही प्रकारची ददात नसेल, जेव्हां त्याचा जीव आनंदातिशयानें खुषीत आला असेल, तेव्हाच त्याचें स्वत्व प्रकट होते, असेंच मला वाटते आपण उत्तर द्याल.

आपलें उत्तर काही अंशानी बरोबरच आहे. कारण एखादा मनुष्य पूर्ण समाधानाच्या स्थितीत असतांना त्याच्या हातून परोपकारादि सत्कृत्यें सहजच घडतात. गायन-नृत्य-वादन इत्यादि ललितकला विशेषत: कलावंताच्या आनंदातून निर्माण होतात. तत्त्वज्ञानासारखा विषय तर रित्या पोटापेक्षा भरलेल्या पोटालाच अधिक सुचतो. ह्या सर्व गोष्टीत माणसाचें स्वत्व प्रकट होते, नाहीं असे नाही; पण तें पूर्णांशानें प्रकट होतें असें म्हणता येणार नाही.

मनुष्याचें खरें स्वत्व त्याला जेव्हां कोणाकडून तरी आव्हान दिले जातें तेव्हांच व्यक्त होतें. मनुष्याच्या हातून हरघडी काही ना काही घडतच असतें आणि त्यात थोड्या फार अंशाने त्याचे व्यक्तिमत्त्व प्रकट होत असतें. त्याचें चालणें-बोलणे, हसणे-जेवणें, बसणे ह्या सर्वात वैशिष्ट्यपूर्णता असते. पण त्याचे संपूर्ण व्यक्तिमत्त्व, संपूर्ण स्वत्व नित्याच्या हालचालीत उत्कटत्वाने दिसून येत नाही. तें फक्त त्याला जेव्हां तुम्ही आव्हान द्याल, त्याला डिवचाल, चिडवाल, तो जेव्हां म्हणेल 'असं काय ? बघा तर माझं स्वत्व !' तेव्हांच प्रकट होईल.

उत्तम गवयांच्या बाबतीत असें फार वेळां बघायला सांपडतें. त्यांना एकट्यानाच गाण्याचा प्रसंग आला तर त्यांचें गाणें क्वचितच रंगतें. पण अगोदर एखाद्या सामान्य गवयाचें किंवा प्रतिपक्षी गवयाचें गाणें झालेलें असलें आणि त्यानंतर खांसाहेबांचे गाणें झाले तर मग त्या गाण्याला जो रंग भरतो तो कांहीं औरच असतो. जातजातीच्या ताना, मुरक्या, हरकती, मिंडा घेऊन ते अगदीं संगीताचा फुलौरा निर्माण करतील. ह्याचें कारण उघडच आहे.

गायनकलेंतील त्यांच्या स्वत्वाला डिवचण्यांत आलेलें असतें, आव्हान देण्यांत आलेलें असतें.

जी गोष्ट गवयाची, तीच वक्त्याची. प्रभावशाली वक्तृत्व तुम्हांला ऐकायचें असेल तर वक्त्याला गमतीनें थोडेंसे चिडवा-खिजवा आणि मग बघा तो असें कांहीं बोलूं लागेल, की साऱ्या शरीराचे कान करून तुम्हाला तें ऐकत राहावेंसें वाटेल! समर्पक दृष्टान्त, बिनतोड कोटिक्रम, प्रसादपूर्ण अस्खलितपणा, बेतशीर विनोद आणि सात्त्विक आवेश ह्याची तो अशी माफक योजना करील कीं तुमच्या आणि त्याच्या हृदयाच्या तारा समस्वरी बनून, तो बोलेल त्याला तुम्ही मान हालवाल, तो सांगेल तें करायला तुम्ही सिद्ध व्हाल! कै. शिवरामपंत परांजपे ह्यांचें वक्तृत्व अशा प्रकारचें होतें. डॉ. विनायकराव सावरकर ह्यांचें वक्तृत्व अशा प्रकारचें आहे.

खऱ्या स्वत्वाचा जन्म समाधानापेक्षां असमाधानातून होतो असें म्हटलें पाहिजे. सुखं च मे, शयनं च मे— अशा स्थितीत तुम्ही गाद्या-गिरद्यांवर लोळाल ह्यात शंका नाहीं. पण ह्यापेक्षा तुमच्या हातून विशेष कांहींही होणें शक्य नाही. तुम्ही अडचणींत असाल, संकटांत असाल तेव्हाच तुमच्या कर्तबगारीला खरें आव्हान मिळून तुमच्या हातून 'विशेष' कांहीं होऊं शकतें. तात्यासाहेब केळकरांच्या वाङ्मयांत 'मराठे व इंग्रज' ह्या ग्रंथाला विशेष मान दिला जातो. कारण त्यात केळकराच्या लेखनवैशिष्ट्याच्या सर्व तऱ्हा आल्या आहेत. त्याचे व्यक्तिमत्व त्यात संपूर्णपणें प्रकट झालें आहे. असला ग्रंथ पूर्ण स्वास्थ्याचा उपभोग घेत असतांना त्यानीं लिहिला असावा असें आपणाला वाटल्यास नवल नाही. कारण सामान्यपणें ग्रंथकर्तृत्व हें फुरसतीच्या वेळींच होत असते. पण ह्या ग्रंथाच्या बाबतींत असें झालें नाही. होमरूलची चळवळ ऐन भरांत असताना आणि केळकरांना घडीची फुरसद नसतांना त्यांनीं हा ग्रंथ लिहिला! पेशवाई नष्ट झाल्याला इ. सन १९१८ सालीं शंभर वर्षें झाली होती. शंभर वर्षें आपण दास्यत्वांत, पारतंत्र्यांत काढलीं! कां काढलीं? कशीं काढलीं? ह्या विचारांनीं त्यांना डिवचलें होतें. त्यांच्या हृदयसागरांत मंथन सुरू झालें होतें. साहजिकच त्यांतून 'मराठे व इंग्रज' ह्या ग्रंथासारखें तेजस्वी रत्न बाहेर पडलें.

निरनिराळया संशोधकांचीं चरित्रें पाहिलीं तरी त्यांत हेंच आढळतें. अमेरिका खंडाचा शोध लावणारे अमेरिगो, मॅगलन, कोलंबस, हडसन, ऑरेलाना; किंवा ऑस्ट्रेलिया खंडाचा प्रथम शोध लावणारा कॅप्टन कुक; आफ्रिकेचा शोध लावणारा मंगोपार्क किंवा हिंदुस्थानचा शोध लावणारा वास्को-डि-गामा ह्यांना किती निरनिराळ्या प्रकारची संकटें सोसावी लागली, किती प्राणांतिक प्रसंगांशी टक्कर खेळावी लागली ! पण तीं सर्व संकटें एक प्रकारच्या ईर्ष्येनें त्यानीं सहन केली. ह्याचें कारण त्याच्या पौरुषत्वाला एक प्रकारचें आव्हान मिळालें होतें– तें डिवचलें गेलें होतें आणि म्हणूनच त्यांचें खरें स्वत्व ह्या अडचणीच्या प्रसंगीं उघडकीस आलें. एरवीं तें येतें ना.

पूर्वी राजकन्यांचें स्वयंवर होत असे. फार उमदेपणा होता त्यांत. त्यासाठीं देशोदेशीचे राजे एकत्र येत. राजकन्येच्या नांवानें मत्स्यवेध, धनुर्भंगासारखा एखादा पण जाहीर केला जाई. आणि हा पण जो जिंकील त्याच्या गळ्यात राजकन्या सलज्ज मुद्रेनें पण हर्षभरानें माळ घालीत असे. 'पण' म्हणजे तें एक प्रकारचें आव्हानच असे. जमलेल्या क्षत्रियाच्या कर्तबगारीला डिवचण्याचें तें एक साधन होतें. ह्या डिवचण्यानें प्रत्येकाचें स्वत्व उत्तम प्रकारें प्रगट होई. ही फार चांगली पद्धत होती असें मला वाटतें. इतकेंच नाहीं, तर लहान प्रमाणांत ती सार्वत्रिक रीतीनें सुरू केल्यास फार चागलें होईल असें माझे ठाम मत आहे. सध्याची आपली विवाहपद्धति अगदीं मिळमिळीत किंवा गिळगिळीत स्वरूपाची झाली आहे. आईबापांनीं अगर पालकानी वधू किंवा वर ह्यांचें संशोधन करायचें, एक बोहलें, दोन भटजी आणि 'शुभमंगल सावधान' म्हणून वधूवरांचें लग्न झाल्याचें जाहीर करायचें ! ह्यांत चमचमीतपणा आणायचा असल्यास त्याला जुन्या स्वयंवराचें थोडेसें स्वरूप द्यायला हवें. मात्र त्याच्याच जोडीला खिळाडूपणा वाढला पाहिजे. नाहीतर ह्या छोट्या स्वयंवराचें रूपांतर मोठ्या कुरुक्षेत्रांत होणें अशक्य नाहीं ! पण हा प्रयत्न मात्र करून पाहाण्याजोगा आहे. कारण विशिष्ट 'पण' जिंकल्यास आपणाला एका युवतीचें पाणिग्रहण करायला सांपडणार आहे ह्या विचारासारखा चित्तवृत्ति उल्हसित करणारा दुसरा विचार सांपडणें कठीण आहे. स्वयंवराच्या प्रसंगीं वधू ज्याप्रमाणें स्वतःला अधिकाधिक आकर्षक

करण्याचा प्रयत्न करते, त्याचप्रमाणें वरही स्वतःला खुपसुरत बनविण्याचा प्रयत्न करीतच असतो. पूर्वीचा वर आपली तरवार परजून व धनुष्यबाण ठाकठीक करून स्वयवर-मंडपात जात असला तर आधुनिक वर गुळगुळीत दाढी करून, केस चापून चोपून बसवून व प्रसन्न चेहऱ्याने ह्या नव्या स्वयं-वराला जाईल. त्याच्या दृष्टीनें तो सुमंगल प्रसग होय. कारण त्याच वेळी त्याला आपल्या खऱ्याखुऱ्या स्वत्वाला प्रकट करायला अवसर मिळणार. आधुनिक 'पण' ही वेगळयाच प्रकारचे असणार. तुमची संभाव्य वधू तुम्हाला टेनिस खेळता येतें किवा नाही, हिशेब ठेवता येतो किवा, नाही, शॉर्टहॅड-टायपिंग येते किवा नाही, दिलरुबा वाजवितां येतो किवा नाही, अडल्या प्रसंगीं उप-योगी पडणारा स्वयंपाक येतो किवा नाही, एखादी लघुकथा लिहिता येते किवा नाहीं, वादविवाद करता येतो किवा नाहीं, बायकोवर रागावता येतें किवा नाहीं– ह्या किवा अशाच प्रकारचा 'पण' जिकायला सागणार; आणि त्या वेळी तुम्ही खरे पुरुष असाल तर तुम्हांला स्फुरण होऊन तें आव्हान स्वीकारा-वेंसें वाटेल आणि आपले स्वत्व हिरीरीनें व्यक्त करावेसे वाटेल.

आव्हानांचा स्वीकार मी नेहमीच करीत आलों आहें. जो पेशा मी स्वीकारला आहे त्यांत द्वंद्वयुद्धाचें आव्हान साहजिकच कोणींही मला आतापर्यंत दिलेलें नाही; परंतु ह्याखेरीज शिकण्याचें किवा शिकविण्याचें, बोलण्याचे किंवा लिहिण्याचें–असलीं छोटीं आव्हानें मला मधून मधून नेहमीं येतात व तीं मीं आनंदानें स्वीकारतों. आव्हान स्वीकारणें हा माझ्या सामर्थ्यापेक्षां स्वाभिमानाचा प्रश्न मला जास्त वाटतो. मात्र एकदा आव्हान स्वीकारल्यावर प्रयत्नांची शिकस्त करून सामर्थ्याची उणीव भरून काढल्याखेरीज मी राहात नाहीं; इतकेंच नाहीं, तर एक गुपितही येथे सांगायला हरकत नाही. अशा वेळीं कुठून तरी वेगळी शक्ति नि युक्ति ह्यांचा संचार स्वतःच्या ठिकाणी झाल्या-सारखें मला वाटते. आणि सामान्यपणें स्वीकारलेले आव्हान यशोदायी ठरतें. ह्या ओळी लिहीत असतांना असल्या कितीतरी प्रसंगांची मला आठवण होत आहे; पण त्याचा उल्लेख करणें हें आत्मस्तुतीच्या सदराखाली जाणारें असल्यानें त्याविषयीं मुग्धताच स्वीकारलेली बरी.

पण मला वाटतें, हा सामान्यतः सर्वांचाच अनुभव असावा. आव्हान स्वीकारण्यापूर्वीची साशंकता व भीरुता हीं मागाहून नाहीशीं होतात आणि त्याची जागा आत्मविश्वासाकडून घेतली जाते. आत्मविश्वास एकदा उत्पन्न झाल्यावर मग कसली उणीव भासणार होती ? यश मिळविण्याचे नवे नवे मार्ग दिसूं लागून आव्हान स्वीकारण्याचा शेवट गोड होतो.

तुम्ही ह्याचें स्पष्टीकरण एखाद्या शरीरशास्त्रज्ञाला विचारल्यास तो असें म्हणेल. आव्हानाचा स्वीकार म्हणजे लढाईची पूर्वतयारी. आपल्या शरीरात ॲड्रिनाल नांवाच्या ज्या महत्त्वाच्या ग्रंथी असतात; त्या स्वसंरक्षणाचा प्रसंग कोणत्याही रूपानें उत्पन्न होतांच पाझरूं लागतात. त्यामुळें नेहमीपेक्षां शरीराला रक्ताचा पुरवठा जास्त होऊन एक नवाच उत्साह, एक नवीनच शक्ति मनुष्याच्या ठिकाणी उत्पन्न होते. जुन्या मापानें बोलायचें झाल्यास असे म्हणतां येईल, कीं दशसहस्र नागांचें बळ तुमच्या अंगात उत्पन्न झाल्यासारखें तुम्हांला अशा वेळी वाटते आणि क्षणभर प्रतिसृष्टि निर्माण करण्याच्या पवित्र्यात तुम्ही उभे राहातां !

एक प्रकारची लढाऊ वृत्ति, संग्रामवृत्ति मनुष्याच्या ठिकाणीं जात्याच असते असें म्हटलें पाहिजे. प्रत्यक्ष शस्त्र घेऊन लढण्याचीं कारणें नेहमींच उपस्थित होत नसली तरी इतर दृष्टींनी लढाई करण्याचे प्रसंग आयुष्यांत नेहमीं येतात. सत्यासाठीं, न्यायासाठी, स्वाभिमानासाठीं, मतप्रतिपादनासाठी मनुष्याला विशिष्ट प्रकारची लढाई करावीच लागते. ह्या लढाईकरिता त्याला प्रतिपक्षीयाकडून आव्हान दिलें जातें; व मग मनुष्याचें शक्तिसर्वस्व प्रकट होतें. सॉक्रेटीस, गॅलिलिओ, मार्टिन ल्यूथर, हरिश्चंद्र, सत्यव्रत, बलि, लो. टिळक, म. गांधी इत्यादि प्राचीन-अर्वाचीन झुंजारानी आयुष्यभर सत्यासाठीं, न्यायासाठीं, मानव्यासाठीं लढाया केल्या आहेत. इतकेंच नाही, तर ह्या लढायांच्या प्रसंगीं त्यांच्या ठिकाणीं कांहीं विलक्षण व अपूर्व असे तेज प्रगट झालें आहे.

मनुष्याचा स्वभावच हा, कीं तो आव्हानांच्या शोधांत फिरत राहातो. आव्हान जितकें चांगल्या कार्याकरितां असेल तितकें त्याचें तेज अधिक उच्च दर्जाचें व्यक्त होतें. आव्हान सामान्य असेल तर त्याचें स्वत्वही सामान्य दर्जाचेंच प्रकट होईल. माझ्या शेजारीं राहाणाऱ्या ठमाबाई ( त्यांचें खरें नांव

आहे सुमतिबाई; पण त्यांच्या वर्तनाकडे पाहून आम्ही त्यांना ह्या नांवानें आपापसांत ओळखतों. ) नेहमीं सर्वांशी भांडत असतात. भांडणाच्या शोधांतच असतात त्या. भांडतांना त्यांचे होणारे हातवारे, त्यांच्या डोळ्यांची हालचाल, त्यांच्या फेंदारलेल्या नाकपुड्या, त्यांच्या कपाळावर तरारून येणारी एक विशिष्ट शीर आणि त्यांच्या तोंडांतून निघणारी मुक्ताफळें हीं सर्वच्या सर्व स्वत्वपूर्ण असतात. बाहेरची भांडणें नसतील त्या वेळी त्या आपल्या अबोल नवऱ्याशीच भांडत असतात व तो उलट कांहीही बोलत नसल्यामुळें त्या खूप चिडतात, खूप संतापतात, त्याला खूप शिव्या देतात व घरांतली भांडीं आपटूं लागतात.

महायुद्धाकडे पाहिलें तर काय दिसतें ? जर्मनी-इटली आदि गट्टी राष्ट्रांनीं जसें इंग्लंड-अमेरिकादि दोस्त राष्ट्रांना आव्हान दिलें होतें तसेंच उलट जर्मनीलाही इंग्लंडनें आव्हानच दिलें होतें. हा परस्पर आव्हान देण्याघेण्याचा प्रसंग किती रोमहर्षक व चित्तवेधक आहे तो आपण बघतोंच आहोंत. ( त्याची झळही बरीचशी आपणाला लागली आहे ! ) ह्या आव्हानानें साऱ्या जगातील राष्ट्रें जागृत होऊन आपलें राष्ट्रीयत्व उत्तमात उत्तम रीतीनें व्यक्त होईल ह्याची खबरदारी घेऊं लागलीं. रशियासारख्या नव्या विचाराचें जन्मस्थान असणाऱ्या राष्ट्रानें तर हें आव्हान इतक्या उत्साहाने स्वीकारले, कीं रशियन लोकातील उत्तमोत्तम गुणांची परिसीमाच सर्व क्षेत्रात दिसूं लागली. उत्तम सैनिक, उत्तम सेनापति, उत्तम संशोधक, उत्तम नागरिक, उत्तम राजकारणी अशा सर्वच नात्यानीं रशियनांनी अगदी कमाल करून सोडली. रशियन सैनिकांविषयीं त्यांचा शत्रु अशा जर्मन सेनापतींनी अगदीं मुक्तकंठानें धन्योद्गार काढले आहेत. तीच गोष्ट चीनची. जवळजवळ एकाकी अशा अवस्थेत गेल्या सहा सात वर्षांपासून चीन जपानशीं लढत आहे. जपानी आक्रमण थोपवून धरण्याचें भगीरथ कार्य चिनी जनता करीत आहे. चहा पिण्यांत आणि अफू खाण्यांत साऱ्या जगाला लाजविणारी एका काळची चिनी जनता जपान्यांच्या आव्हानानें इतकी स्वत्वजागृत झाली आहे, कीं न भूतो न भविष्यति ! आत्मबलिदान केव्हांही करायला सिद्ध असणाऱ्या जपानला चिनी मनुष्य एखाद्या न उलगडणाऱ्या कोड्यासारखा वाटत आहे.

आणि आम्ही ? आम्ही कोड्यासारखे कोणालाच वाटत नाहीं; कोडग्या-सारखे कदाचित् वाटत असूं ! नाहीं म्हणायला एका अर्थानें आम्ही जगाला कोड्यासारखे वाटत आहों खरेंच. चाळीस कोटी लोकांचें आपले राष्ट्र पार-तंत्र्यात पाहून बाकीच्या जगाला तें एक कोडेच वाटत आहे ! ह्याखेरीज आमच्याविषयी कोणालाच कांही वाटत नाही. कै. आगरकरांनी उल्लेखिलेली आमची शिलावस्था अजून संपलेली नाहीं.

सुदैवाने सारें जगच इतकें जवळजवळ येत चालले आहे, की हिंदु-स्थानाची शिलावस्था फार वर्षे टिकणें शक्य नाही. जगाच्या प्रचंड आंदो-लनांची प्रतिक्रिया हिंदुस्थानांत झालीच पाहिजे. "आम्हाला जगाशीं कर्तव्य नाहीं; आम्ही आमची स्नानसंध्या व बायकामुलें साभाळणार" असें म्हणून ह्यापुढें भागणार नाही. एक प्रकारचें राष्ट्रीय आव्हानच अमूर्त अशा शक्ती-कडून भारताला मिळालें आहे. ह्या आव्हानाचा आम्ही हर्षभराने स्वीकार करणार कीं स्वस्थ बसणार ? आपले स्वत्व प्रकट करण्याची ही संधि आम्ही केव्हाही घालविणार नाही. कारण सन्मानपूर्वक जगण्याकरितां आम्ही जन्माला आलों आहोत.

# कुरूप स्त्रिया

सुंदर स्त्रियाच्यासंबंधी लिहिलेले लेख व सुंदर स्त्रियांचीं वर्णनें वाचण्याची संवय जडलेल्या वाचकाना ह्या लेखाचा मथळाही आवडणें शक्य नाहीं. विशेषतः सुंदर आहेत त्या तर ह्या लेखाकडे ढुंकूनही पाहाणार नाहीत, ह्याची मला खात्री आहे. आणि असे असूनही कुरूप स्त्रियाविषयीं माझे विचार जाहीर करण्याचे धाडस मी करीत आहें !

ह्याला कारणे अर्थातच आहेत. जगांतील जर कुठल्या एखाद्या गोष्टीनें माझ्या अन्तःकरणात विलक्षण दयेची, अनुकंपेची, सहानुभूतीची, उद्विग्नतेची भावना उत्पन्न होत असेल तर ती गोष्ट म्हणजे कुरूप स्त्रिया ही होय. कुरूप स्त्रिया पाहिल्या म्हणजे माझ्या हृदयाची विलक्षण कालवाकालव होते, अन्तःकरणाला कुठें तरी असह्य वेदना होऊं लागतात.

कुरूप स्त्रियांत दिसण्यात कुरूप व शारीरिक व्यंग असलेल्या स्त्रियांचा मी मुख्यतः अन्तर्भाव करतो. तसेच विचाराच्या सोयीकरिता भीक मागून पोट भरणाऱ्या कुरूप स्त्रियाचा अन्तर्भाव प्रस्तुतच्या स्वैर विचारात मी करीत नाही. बाकीच्या सर्व कुरूप स्त्रियाना माझ्या लहानग्या लेखात वावरायला भरपूर वाव आहे.

माझ्या दारावरून जाणाऱ्या रहदारीकडे बघत राहाणें ही एक माझी रिकामपणाची कामगिरी आहे. माझ्या खिडकीबाहेर वावरणाऱ्या ह्या चालत्या जगाकडे पाहाण्याचा मला कधीं कंटाळा येत नाही. विश्वाचें विविध, भव्य पण विशिष्ट हेतूने चाललेले विराट स्वरूप पाहून कधीं मी आश्चर्याने थक्क होतों, कधीं आनंदानें बेहोष होतो, तर कधी उद्विग्नतेने विषण्ण बनतो. काहीं विलक्षण जादुगिरी त्या दृश्यात आहे ह्यांत शंका नाही.

माझ्या दारावरून इतर अनेक लोक जसे जातात, तशाच काही बायाबापड्या व पोरीबाळीही जातात. त्यात काहीं कुरूप स्त्रियाही असतात. त्या जेव्हां जातात तेव्हा दुःखाची एक तीव्र भावना मनात निर्माण होते. उदाहरणार्थ—एक अठरावीस वर्षांची तरुण मुलगी जाते. कुठल्या तरी अपघातांत

तिचें अर्धे तोंड व शरीराचा अर्धा भाग जळल्यानें, जळलेला भाग लालसर–पांढरा असा दिसतो; व बाकीचे शरीर काळें दिसतें. तिचा एक डोळा खाली ताणला गेल्यानें, ती गरीब मुलगी अकारण भयंकर दिसते! दुसरी मुलगी रूपानें एरवी चांगली असून तिचे तोंड व दोन्ही हात कोडानें अगदी भरले आहेत! तिसरी एक बाई जाते, तिचे दोन्ही हातच थोटे आहेत! चौथी एक तरुणी जाते, ती कंबरेंतून वाकडी आसल्यानें १३० अंशाचा जमिनीशी कोन करून रस्त्यावरून जात असते! पाचवी एक मुलगी जाते तिच्या पायाना कमानी असल्यानें ती फेंगडी चालते! आणखीही काही कुरूप स्त्रिया जातात. पण वानगीदाखल एवढी यादी पुरे होईल. ह्या सर्व स्त्रियाकडे मी सहानुभूतीनें पाहातो, आणि त्या जेव्हां जेव्हा माझ्या दारावरून जातात, तेव्हा तेव्हां माझें मन बेचैन व विषण्ण बनतें.

मला वाटतें कुरूप स्त्रियाच्या इतक्या अभागिनी दुसऱ्या कोणत्याही स्त्रिया नसतील! ह्या बिचाऱ्यांना कांहीं तरी भविष्यकाळ आहे का? विवाह ही प्रत्येक स्त्रीच्या आयुष्यातील महत्त्वाची घटना! कुरूप स्त्रियाच्या वाटणीला ही घटना कोठून येणार? लग्न करावेंसें ह्या स्त्रियाना नसेल का वाटत? पण ह्याच्याशीं कोण लग्न करणार? पूर्वीच्या काळी एक वेळ पुरुषाचें लग्न राही, पण मुलगी काणी–कुबडी कशीही असली तरी तिचे लग्न होई, असें घरातील वडील मंडळी सांगतात. माझा या गोष्टीवर विश्वास बसत नाही. पण वृद्ध मंडळी सागतात, त्या अर्थी ही गोष्ट खरी असावी. तें कसेंही असलें तरी ह्या नव्या जमान्यांत, नव्या विचाराच्या–नव्या साधनाच्या नव्या जमान्यात कुरूप स्त्रियाना लग्नाच्या बाजारांत काडीइतकी देखील किमत मिळत असेल असें वाटत नाही. म्हणजे मग किती भयंकर ही घटना असूं शकेल ह्याची कल्पना करा. आणि कल्पना येत नसेल तर आपल्याला एक कुरूप मुलगी किवा कुरूप बहीण आहे असें मानून तिच्या भविष्यकाळाविषयी विचार करू लागा. माझी खात्री आहे आपल्या डोळ्यासमोर काजवे चमकूं लागतील.

मी स्वत: जेव्हां अशा तऱ्हेनें वैयक्तिक विचार करूं लागतो तेव्हा मी भांबावून जातों; आणि मनांतल्या मनांत देवाजीला प्रार्थना करतों, "बाबारे, संतति देणार असलास तर ती सुरेख दे, अव्यंग दे, निरोगी दे. माझ्या

शत्रूला कोणत्याही प्रकारची कुरूप संतति देऊं नकोस. दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेनें त्याचा छळ कर; पण असा छुपा छळ करूं नकोस."

तुम्ही म्हणाल, अव्यंग व सुरेख मातापितरांनी अशी प्रार्थना करण्याचें कारण काय? कारण एकच. अव्यंग व सुरेख आईबापांचीं मुलें अव्यंग व सुरेख होतातच असे नाहीं. ईश्वर एखादे वेळीं असा भयंकर विनोद करतो कीं, सुरेख मातापितरानाच नेमकी कुरूप मुले तो देतो. माझ्या माहितींतल्या एका सुस्वरूप जोडप्याला असें गोजिरवाणे बाळ झालें, कीं जन्मतःच त्याला दोन सुळे दांत होते व त्याचा एक डोळा गहाळ झाला होता! बोला, आतां सुप्रजाजननशास्त्राचे तुम्ही अगदीं प्रोफेसर असलांत, तरी ह्या बाबतींत तुमच्या-वर केव्हां तरी हात टेकण्याचा प्रसग येणारच येणार आणि म्हणून तुमच्या-माझ्यासारख्या सामान्य माणसांनीं प्रार्थना करून देवाला लाच देऊन ठेवायची! म्हणजे तो कुरूप संतति देण्याचा विनोद निदान आपणावर तरी करणार नाही.

पण इतकेंही करून, समजा, आपणाला तशी संतति झाली तर मात्र आपण गोगलगाय बनूं. आपणाला तो एक निरंतरचा कमीपणा वाटेल; आणि आपण तसली संतति देवाजीनें आपल्या घरी न्यावी, असेंही एखादे वेळीं निराशेच्या भरांत म्हणूं. पॅरिसमधील एका मातेनें काही वर्षांमागें आपलें कुरूप मूल भावनेच्या भरात स्टोव्हवर भाजून मारल्याचें वर्तमानपत्रांत मीं वाचलें होतें! पण असली गोष्ट अपवादच मानली पाहिजे. मला पक्कें माहीत आहे, कीं मुलें कितीही कुरूप असली तरी ती आईबापांना—विशेषतः आईला-कधीही नकोशीं होत नाहींत. आणि असल्याच आईबापांकरितां व त्यांच्या कुरूप संततीकरिता येथें दोन शब्द सांगण्याचें मीं योजिलें आहे. अशा मंडळींनीं कांही गोष्टी करण्याजोग्या आहेत.

ह्या प्रयत्नांतील पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपलें व्यंग झाकून ठेवण्याचा प्रयत्न करणें. आपलें कोणतेंही व्यंग असो, तें जर लोकांना दिसण्याजोगें असेल, तर तें लपविण्याचा व्यर्थ खटाटोप करूं नये. असा प्रयत्न हास्यास्पद होतो. डुकराचे कान असलेल्या एका राजाची गोष्ट लहान मुलें सांगतात. त्या राजानें आपले आखूड कान लपविण्याचा कसून प्रयत्न

केला. पण शेवटीं तो फसला व त्याच्या कानाची कथा जगजाहीर झाली! आपलें जें कांही व्यंग असेल तिकडे संपूर्णपणें दुर्लक्ष करावें हेंच चांगलें.

दुसरी गोष्ट म्हणजे त्या व्यंगावांचून आपलें काहीं अडत नाही, अशी भावना व खात्री इतरांची होईल अशा तऱ्हेचें वर्तन करावें. एका अत्यंत सुस्वरूप मुलीला खाद्यापासून मुळीं दोन हातच नव्हते! तेव्हां ती आपल्या पायांचा अगदीं हातासारखा उपयोग करी! ती आपल्या पायानीं पत्ते खेळे, केस विंचरी, इतकेंच नाहीं तर चमच्याकाट्यांनीं जेवी देखील! ती मुलगी सर्वस्वी स्वावलंबी होती. तिनें आपलें व्यंग लपविण्याचा कधींही प्रयत्न केला नाही.

तिसरी गोष्ट सर्वांना करतां येण्याजोगी आहे. कुरूप स्त्रियानी शक्य त्या कला हस्तगत करून त्यांत प्रावीण्य मिळवावें. शिवण, भरत, गायन, वादन, लेखन ह्यापैकीं जी कला साधेल तिच्यामागें तन्मयतेनें लागावें. न्यूनाची भरपाई करण्याचा ईश्वराकडे न्याय आहे. त्या न्यायानें कुरूप स्त्रिया उत्तम कलाभिज्ञ बनूं शकतात. कुरूप स्त्रीचें सभागृहांतील गाणें कोणाला आवडलें नाहीं, तरी रेडिओवरील तिचे स्वर्गीय संगीत नावडायला काहीच कारण नाहीं. कुरूप स्त्रियाचें शिवणकाम, भरतकाम ही कुरूप असणे शक्य नाहीं. त्या लेखिका बनल्या तर कितीतरी मार्मिकपणें लिहूं शकतील. मात्र शिक्षिकेचा किंवा परिचारिकेचा धंदा कुरूप स्त्रियांनीं पत्करूं नये. कारण त्यांच्या कुरूपतेचा विद्यार्थ्यांवर किंवा रोग्यावर उद्विग्नकारक परिणाम होण्याचा संभव फार.

अशा काही खबरदाऱ्या घेऊन कुरूप स्त्रियानीं आपली जीवनयात्रा आक्रमिण्याचा विचार केल्यास ती त्याना तर सुखावह होईलच; पण इतराना देखील ती हितकर व अभिनंदनीय वाटेल. कुरूप स्त्रिया झाल्या तरी त्याच्या ठिकाणीं मानसिक सौंदर्य किती असूं शकते, ह्याची जगाला खात्री पटेल. आणि साऱ्या जगाच्या सहानुभूतीचा प्रवाह त्यांच्याकडे वाहूं लागेल. इतकेंच नाहीं तर कुब्जेला जसा श्रीकृष्ण भेटून तिचा उद्धार झाला तसा कुरूप स्त्रियांनाही उद्धारक भेटणें अशक्य नाही.

# माझ्या ग दारावरनं

**माझ्या ग दारावरनं । मैत्रांचा मेळा गेला ।**
**टोपीवरनं ओळखिला । भाऊराया ॥**

माझ्या दारावरून जाणाऱ्या येणाऱ्या रहदारीकडे बघत राहाणे, ही एक माझी रिकामपणची कामगिरी आहे. मला जेव्हा जेव्हा वेळ मिळेल किंवा कामाचा कंटाळा आला असेल, तेव्हा तेव्हा खिडकीच्या बाहेर दिसणाऱ्या फिरत्या जगाकडे मी बघत राहातों. विश्वाच्या त्या बहुविध स्वरूपाकडे बघत असताना मला कधींही कंटाळा येत नाही. अनंत प्रकारच्या पण एका विशिष्ट हेतूनें चाललेल्या त्या सर्व हालचालीकडे पाहून माझ्या मनाची भरपूर करमणूक होते.

इंग्लिश कवि लॉर्ड टेनिसनने 'लेडी ऑफ शेलॉट' ह्या नावाचें एक भावपूर्ण काव्य लिहिलें आहे. त्यातील नायिकेला आपल्या खिडकीबाहेरच्या जगाकडे बघण्याची मनाई होती. तिला एक प्रकारचा शाप होता. खोलीच्या आत खिडकीसमोर ठेवलेल्या आरशात बाह्य जगाचीं जी कांहीं प्रतिबिंबें दिसतील, तेवढीच बघण्याची तिला मुभा होती ! प्रत्यक्ष जग पाहाण्याची मात्र तिला मोकळीक नव्हती ! बिचारी तरुणी ! एकदा एका उमद्या व तरुण शिलेदाराचें प्रतिबिंब आपल्या आरशात दिसताच, त्या तरुणाला प्रत्यक्ष पाहाण्याची तीव्र इच्छा तिला होऊन, तिनें आपल्या खिडकीबाहेर बघितलें ! तों काय ? आरसा एकाएकीं दुभंगला आणि शापानें घेरलेल्या त्या तरुणीचा पुढे शोकजनक अंत झाला ! आपलें केवढें भाग्य, की आपल्यावर असा कोणताही शाप नसून आपण आपल्या खिडकीबाहेरच्या जगाकडे डोळे भरून पाहूं शकतों, असें मला पुष्कळ वेळां शॅलॉटच्या ह्या स्त्रीची आठवण होताच वाटतें. माझ्या खिडकीबाहेर दिसणाऱ्या रहदारीत केवढी मनोज्ञ विविधता असते !

अगदीं पहाटे माझ्या दारावरून कारखान्यांत किंवा मिलमध्यें काम करणारे मजूर जातात. त्यांच्या हातांत शिधोऱ्या असतात व पायात लगबग असते.

स्त्री-पुरुष मजूर मिळून मिसळून जात असतात. काळोखात त्यांच्या आकृत्या अंधुक दिसतात. पण त्यांच्या हसण्या-खिदळण्यावरून व थट्टा-विनोदावरून त्यांच्यांत बराच मोकळेपणा असावा असें कोणीही म्हणेल! लढाईमुळें पगाराव्यतिरिक्त ह्या मजुराना बराच पैसा मिळतो. त्यामुळें तूर्त त्यांची चंगळ आहे. पण 'कशाला उद्यांची बात' ह्या सामान्य तत्त्वज्ञानाची ही कामगार मंडळी असल्यानें, मिळत असलेला आनंदच ते लुटत आहेत.

मजुरांच्या नंतर माझ्या दारावरून भाजीपाल्याच्या गाड्या जातात, त्या दहा-बारा मैलांच्या टापूंतून भाजी घेऊन आलेल्या असतात. गाड्याना जुंपलेल्या बैलांच्या गळ्यांतील घुंगरांचा आवाज मोठा मनोहर होत असतो. वेळ पहाटेची असल्यानें तीं घुंगरें जणूं काय भूपाळ्या म्हणत आहेत असें वाटतें. रात्रभर चालून व कोठेंही आडवाटेला न जातां, गाडींत झोपलेल्या आपल्या धन्याची इमानानें चाकरी करणाऱ्या त्या बैलांकडे पाहून, आपल्या भाषेंत 'बैल' हा शब्द शिवीसारखा का वापरला जातो ह्याचें मला आश्चर्यच वाटतें. मनुष्य हा कृतघ्न आहे कीं काय?

आणखी कांही वेळाने मंडई करायला निघालेले लोक जातात. बडोद्यांत मंडई किंवा भाजी-मार्केटला काच्छावाडी म्हणतात. डोक्यावर टोपी, अंगांत मळकट सदरा, कमरेला आखूड पंचा व खांद्यावर कचेरींतल्या रुमालाची झोळी, अशी ठराविक वेषभूषा करून पुष्कळसे लोक कालपरवापर्यंत काच्छावाडींत जात असत. (आतां कालमानाप्रमाणें त्याच्या ड्रेसांत फरक झाला आहे. पण तो थोडा आहे.) पाच पांच दिवसाच्या दाढ्या वाढल्या आहेत, टोपीबाहेर अर्धी शेंडी लोंबते आहे, झोळीच्या भोकातून कोथिंबिरीच्या काड्या किंवा मिरच्या बाहेर डोकावून बघत आहेत व पंत मारे 'अमका साहेब असं म्हणाला' असें हातवारे करून आपल्या सोबत्याला सांगत आहेत! असलें चित्र नित्य परिचयाचे असूनही माझें मनोरंजन तें अजून करूं शकतें.

नंतर जातात भोइणी. त्या एक मोठें प्रस्थ आहे. मुंबईत कोळिणी मासे विकतात. येथें भोइणी हें काम करतात. त्यांचे पतिदेव नदींतून मासे धरून आणतात व त्या ते चलाखीनें विकतात. ह्या बाया नाकीं डोळीं नीटस पण भयंकर भांडकुदळ असतात. सहज दारावरून जात असल्या तरी आपआपसांत

शिव्या देत देत व बीभत्स बोलत बोलत त्या जातील. त्यांच्या मनोरंजक शिव्या ऐकाव्यात, की त्यांच्या एक प्रकारच्या सौंदर्याकडे पाहावें, कीं त्यांच्या जवळचे बोंबिल विकत घ्यावेत, असा मोह आपणाला वारंवार पडतो, असें माझा एक रसिक मित्र मला सांगत असतो.

नंतर जातात दुकानदार! कपाळावर चंदनाचा टिळा केला आहे, एका हातांत 'गल्ला' व दुसऱ्या हातात किल्ल्यांचा जुडगा घेतला आहे, पुढें आलेलें पोट धोतराच्या खुऱ्यांनीं सावरीत आहेत, असे हे मगनशेठ मरघाभाई अगदीं स्थिरपणें आपल्या दुकानांकडे जात असतात. व्यापार हा प्रामाणिकपणें होतच नाहीं, अशी ह्यांनीं खात्री करून घेतली असल्यानें, गिऱ्हाइकाला कोणत्या नव्या युक्त्यांनीं फसविता येईल ह्या विचारांत ते नेहमीं गर्क असतात!

अकराच्या सुमारास शाळेंत जाणाऱ्या मुलांमुलींचे घोळके माझ्या दारावरून जातात. सदरा–चड्डी घातलेलीं व हातांत फुटकी पाटी व तुटकी पेन घेतलेलीं प्राथमिक शाळेची मुलें प्रथम जातात. कारण त्यांना शिरा ताणताणून 'बेकंबेअऽ बे दुनेऽचार' करायचें असते. एकमेकाच्या खोड्या करीत व एकमेकांना चापट्या देत ही वानरसेना जात असते. लेंघा व सदरा घातलेलीं दुय्यम शाळेंतील मुलें खांद्यावरील पुस्तकांचें ओझें संभाळीत नंतर जातात. त्यांचाही थट्टाविनोद सुरू असतो. पण खरी गंमत मुली जातात त्या वेळी बघावी. यौवनांत नुकतेंच पदार्पण ज्यांनीं केलें आहे, अशा खेळकर–खोडकर मुली जेव्हा आपापसात थट्टा–विनोद करीत जातात, तेव्हां तो ऐकावा! शाळेंतील अभ्यासाच्या, बाईच्या लग्नाच्या, मास्तरांच्या रागावण्याच्या त्या ज्या गप्पा मारीत असतात त्या कांहीं विलक्षण असतात. "अग, काय झालं सांगूं का?" असें म्हणून एखादी मुलगी गोष्ट सुरू करते व बाकीच्या हसत राहातात. शाळेंत जाणाऱ्या ह्या अल्लड दुनियेची एक मौज आहे. घरांत ही दुनिया आनंदात विशेष नसते. पण शाळेंत जाताना व शाळेंतून परत येताना तिच्या आनंदाला पारावार नसतो.

ऐन दुपारीं विशेष रहदारी नसते. पण फेरीवाले निरनिराळा माल घेऊन ह्याच वेळीं गल्लोगल्लीं विकायला निघतात. 'काच बांगडी अ,' 'फॅन्सी कापड–तऱ्हेतऱ्हेकी किनार,' 'कांहीं औषिध घ्या, कांहीं कमरेला घ्या, कांहीं

वाताला घ्या ' असे अगदीं वेगवेगळे विचित्र हेल काढीत हे भटके व्यापारी जात असतात. मनुष्यस्वभावाचे ह्याना बारीक ज्ञान असते व आपला माल कसा खपवावा हें ते बरोबर जाणतात. अशा फेरीवाल्यातूनच कांहीं नामांकित ' लखपति ' निर्माण झाले आहेत, ही एकच गोष्ट त्यांच्या मोठेपणाची साक्ष पटवील.

माणसांच्या ह्या अशाच प्रकारच्या रहदारीप्रमाणे ऋतुचक्राचीही रहदारी मला पाहायला मिळते. हिंवाळयात सकाळच्या प्रहरीं खिडकीच्या बाहेर दाट धुकें पसरलेलें दिसते व त्याचे ढग पश्चिमेकडून पूर्वेकडे चाललेले आढळतात. दुपारच्या वेळीं वाऱ्याच्या झोतानें उडून आलेलीं झाडाची पिवळी पानें दारावरून जातात. ती नाचत बागडत जात असतात. मध्येच ती एकमेकांशी बोलल्याप्रमाणें सळसळ आवाज करतात व मध्येच थकल्याप्रमाणे एखाद्या जागीं निश्चेष्ट पडून राहातात. एखादा राजा बऱ्याच दिवसांनी आपल्या नगरात आला म्हणजे जिकडे तिकडे आनंद होऊन, त्याच्या आगमनाचीं चिन्हें सर्वत्र दिसूं लागतात. तो राहातो आपल्या राजवाड्यातच. पण स्वभाव बाहेरही पसरतो. ऋतुराज वसंताचे आगमन झालें की असेंच होते. खरें वैभव वनातून व उपवनांतून दृष्टीस पडलें तरी इतरही ठिकाणीं त्याच्या आगमनाची साक्ष पटते. अंगावर हर्षाचे रोमाच उभे राहावेत, त्याप्रमाणें झाडाच्या फांद्यांवर नाजूक कोवळीं पानें हलकेच उमलूं लागतात. दयाळ, देव, चिमणा, कोकिळ, इत्यादि गाणाऱ्या पक्ष्यांना कंठ फुटून ते वसंताचीं स्तुतिस्तोत्रें गाऊं लागतात आणि फुलांना बहर येऊन ती सुगंधाची खैरात करतात. आणि पावसाळ्यांत तर मौजच मौज असते. निरनिराळ्या आकारांचे व कमीअधिक काळ्या रंगाचे मेघ जमा होऊन सहस्र धारानी साऱ्या जगाला जणूं कांहीं न्हाऊं घालीत असतात. सर्वांच्या तोंडून अशा वेळीं आनंदाचे सारखेच उद्गार निघत असतात. आणि मग माझ्या दारावरून पाण्याचे छोटे-मोठे प्रवाह खळखळ करीत जाऊं लागतात, त्यांची शोभा काही विलक्षण असते. वाटेच्या दोन्ही बाजूनीं उतारावरून जाणारे पाण्याचे हे प्रवाह पाहिले, कीं वेणीचे दोन शेपटे दोन खांद्यांवर मोकळे सोडून ऐटीनें जाणाऱ्या एखाद्या रमणीची मला आठवण होते.

ह्या सर्व रहदारीकडे पाहिलें, की कधी माझें मन आश्चर्यानें चकित होतें, कधी आनंदानें बेहोष होतें तर कधीं उद्विग्नतेनें विषण्ण बनते. विश्वाचें छोटें

स्वरूपच मला तीत आढळतें. ह्या रहदारीला काहीं अर्थ आहे का? ती कोठून येते? कोठें जाते? किती दिवसापासून ती जाते आहे व येते आहे? का ही नुसती पोकळ बडबडीप्रमाणे निरर्थक हालचाल आहे? मला वाटतें ही निरर्थक हालचाल नाही. प्रत्येक हालचालीमागे काही तरी अर्थ आहेच आहे. मात्र तो अर्थ सर्वांकरिता व एकच एक नसून तो निरनिराळ्या लोकांकरितां व वेगवेगळा असा आहे. शॅलॉटच्या त्या अभागिनी स्त्रीला त्यात आपल्या प्रियकराचें प्रतीक आढळले तर एखाद्या रुक्मिणीला त्यांत श्रीकृष्णाचें हवे असलेलें स्वरूप दिसेल. रहदारीत हजारों स्त्री-पुरुष जात येत असतात. त्यात काहीं आपल्या ओळखीचे नसतात व त्याच्याकडे आपण निव्वळ कुतूहलानें बघतों. दुसरे आपल्या ओळखीचे असतात. आणि त्याना पाहून आपल्या चित्तवृत्ति उल्हसित बनतात. ते शरीराने येऊन आपणाला भेटण्यापूर्वी आपलें मन त्यांना मिठ्या मारून आलेले असते. आणखी कांहीं असतात ते आपल्या ओळखीचे नसतात. पण त्याच्यात एक विलक्षण तेज, एक अभिनव चमक, एक वेगळेच आकर्षण असते; आणि आपण त्यांचा चेहरा आपल्या हृदयांत साठवून ठेवतो. आपण कोणाचे शेत शिपतों आहोत ह्याची मेघाला ज्याप्रमाणें पर्वा नसते, आपण कोणत्या चंद्रमण्याला द्रववितों आहोंत ह्याची चंद्राला ज्याप्रमाणे कल्पना नसते, त्याप्रमाणेच ह्या तेजस्वी व दैवी संपत्तीनें श्रीमंत बनलेल्या महाभागाची स्थिति असते. असल्याच एखाद्या महाभागाच्या रूपानें तो देवदेवेश्वर आपल्या दारावरून जात असेल काय?—हा विचार माझ्या मनात येऊन लहान मुली म्हणतात त्या एका ओवीची मला आठवण होते. ती ओवी अशी–**माझ्या ग दारावरनं। मैत्रांचा मेळा। टोपीवरनं ओळखिला। भाऊराया॥**

# पांढरे केस

पाढऱ्या केसांना पाहून बिचकणारे कांहीं लोक मला माहीत आहेत. पाढरे केस म्हटले, की वार्धक्य, असहाय्यता, चोंबडेपणा, चिरचिऱ्या स्वभाव आणि अनुदारता इत्यादि गुणविशेषांची आठवण होऊन हे लोक नाकें मुरडतात हे मला ठाऊक आहे. पाढऱ्या केसांचा प्राणी – म्हणजे मनुष्य – पाहिला, की त्याला दुरून दंडवत करणाऱ्या किंवा त्याची जवळून टवाळी करणाऱ्या काही तरुण स्त्रिया असतात ह्याचीही मला जाणीव आहे. पाढरे केस होतांच तुमचें कितीही सुटसुटीत नांव असो किंवा तुम्ही कितीही थोर असा, लोक तुम्हांला आपापसांत म्हातारा किंवा म्हातारडा म्हणून अवहेलनापूर्वक संबोधूं लागतात ह्याविषयीं माझी खात्री आहे.

पण ह्याचें मला आश्चर्य वाटत नाही. केसाच्या बाबतीतील त्यांच्या अज्ञानामुळे वर उल्लेखिलेल्या लोकाकडून पांढऱ्या केसांविषयी अनुदारपणाचे उद्गार निघत असावेत. 'देव त्याच्या अज्ञानाविषयी त्याना क्षमा करो' असें येशू खिस्ताच्या वाणीनें मी त्याच्याविषयीं म्हणेन. परंतु केसांशी ज्याचें अत्यंत जवळचें नातें आहे, ज्याला केसांची संपूर्ण माहिती आहे, जो केसाची मशागत करण्यांत धन्यता मानतो, किंबहुना ज्याचे जीवन केसावर अवलंबून आहे, अशा न्हाव्याने पांढऱ्या केसाविषयीं अनुदारपणाचे उद्गार काढावेत म्हणजे काय ! पण असले उद्गार एके दिवशीं माझ्याच न्हाव्यानें व माझ्याच केसांसंबंधीं काढले ! काय वाटलें असेल मला त्या वेळीं ? काय वाटलें तें तुम्हांला पुढें कळेलच. प्रसंग घडला तो असा–

वेळ अशी संध्याकाळची होती. दिवस शनिवारचा होता. आठवड्याचें काम संपलें, अशा सात्त्विक आनंदांत मी होतों. उद्यां रविवार ह्या कल्पनेनें माझ्या मनांत गोड झिणझिण्या उठत होत्या. वारा मंद मंद वाहात होता. अशा वेळीं मनाला वाटलें, फिरायला जाण्याऐवजी सलूनमध्ये जावें. मनाची एवढी इच्छा पूर्ण नाहीं करायची तर काय करायचें ह्या विचारानें मी माझ्या आवडत्या न्हाव्याच्या सलूनमध्यें गेलों. नेहमींप्रमाणें त्यानें हसतमुखानें माझें

स्वागत केलें. मी हसत हसत जाऊन आरशात दिसणाऱ्या माझ्या मुख-कमलाकडे ऐटींत पाहात एका खुर्चीवर बसलों.

येथपर्यंत सर्व ठीक झालें. न्हाव्यानें माझे केस व्यवस्थित कापले हेंही ठीक झालें. पण त्यानंतर केसाना तेल लावीत असताना तो म्हणाला, "दादा, केस पुष्कळ पाढरे झाल्याती. पाढरे केस लइ वंगाळ दिसतात. कलप लावूं ? कालेजातली पुष्कळ पोरं कलप लावून घेत्यात."

त्याच्या बोलण्याने मी अगदी आश्चर्यचकित झालों. मला माझा अपमान झाल्यासारखें वाटलें. पण न्हाव्यावर रागावणें म्हणजे अडाणी मनुष्यावर रागावणें असें मी समजत असल्याने मनात विस्मयाचा आणि रागाचा जबरदस्त धक्का बसला असूनही मी शातपणे त्याला म्हणालों, "हें बघा न्हावीदादा, आमच्या धंद्यात पाढऱ्या केसानाच अधिक मान मिळत असल्यानें कलप लावून काळे केस करण्याची मला कांहीं जरूर नाहीं. आतां कॉलेजांतील पोराचं उदाहरण तुम्ही दिलंत. पोरं करतात तें कदाचित् त्यांच्या दृष्टीनें बरोबर असेल. पोरीच्या नजरेत एरवीं त्यांना कसं भरतां येणार ?"

"त्येबी खरंच." असे म्हणत न्हावीदादानें आपलें काम संपविलें. मी थोडेंसे फिरायला म्हणून बाहेर पडलो. पण माझ्या डोक्यांत विचाराचें काहूर माजलें. पाढऱ्या केसाना लोक इतके बिचकतात का ? ह्या एकाच मुद्दयाभोंवतीं अनेक कल्पनातरंग माझ्या मनांत उसळूं लागले.

पाढरे केस 'वंगाळ' दिसायला झालें आहे काय ? पांढऱ्या केसांमुळें सात्त्विकपणा, मृदुता, सहनशीलता इत्यादि गुणविशेष व्यक्त नाहीं का होत ? निदान पांढरे केस वाईट किंवा वंगाळ तरी खास दिसत नाहींत. झाडाचीं पानें पिकून पिवळी व्हावींत, हिरवे गवत सुकून पाढरें दिसूं लागावें त्याप्रमाणें काळ्या केसांचे पांढरे केस होणें ही घटना होय. अत्यंत स्वाभाविक, नैसर्गिक आहे ती गोष्ट. ती तशी न झाली तरच वाईट. क्रमाक्रमानें शरीरांत जसजसा फरक होत जातो तसतशीं त्याचीं बाह्यचिन्हेंही दिसूं लागतात. त्यांना शोभेल असें वागणें हेंच भूषण. त्याना छपवून लोकांच्या मनांत भलत्याच कल्पना उत्पन्न करण्यापासून कांहीं फायदा असला तरी तो अल्प काळ टिकणारा.

आतांच बघा ना ! माझ्या पाढऱ्या केसांना कलप लावून मी जर त्यांचें खरें स्वरूप छपवूं लागलों, तर माझा कांहीं थोडासा फायदा होईल; नाही असें नाही. कांहीं तरुण व काहीं तरुणी माझ्याकडे आपुलकीच्या दृष्टीने पाहातील. आपल्या सभासमेलनातून मला प्रेमानें जवळ बसवतील. पण हा फायदा अल्प-काळ टिकणारा होय. चुकून मी लावलेला कलप त्याच्या नजरेस पडल्यास ते कायमचे माझ्यापासून दूर पळतील. शिगें मोडून वासरात मी शिरूं पाहातो असें त्याना वाटेल आणि मग इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः अशी माझी स्थिति होईल. त्यापेक्षा माझ्या पाढऱ्या केसाकडे पाहून त्याना स्वाभाविक वाटणाऱ्या आदरयुक्त आपलेपणाचा फायदा मी का न घ्यावा ? कांही नाही म्हटले तरी आमच्या धंद्यात अजून पांढऱ्या केसाना मान आहे, काही भाव आहे. परिपक्व बुद्धि, ठरेलपणा, समंजसपणा, आकलनशक्ति, तपश्चर्या वगैरेंसारख्या गुणाचे अधिष्ठान पाढऱ्या केसाच्या ठिकाणी जर कोणत्या धंद्यात मानलें जात असेल, तर तें आमच्या धंद्यातच होय. पांढऱ्या केसामुळें मिळणारा हा गुणाचा वारसा मीं कां घालवावा ?

आमचे एक प्रोफेसर - आता ते खिस्तवासी झाले आहेत - स्वतःच्या काळयांच्या पाढऱ्या झालेल्या केसाचा हवाला देऊन कितीतरी गोष्टी आम्हांला पटवून देत असत. मलाही आता तसे करता येईल. हा लाभ काही थोडाथोडका नाहीं. कोणतेंही मत सागतांना, कारणे न देतां आपल्या पांढऱ्या केसाकडे बोट दाखविलें कीं झाले काम ! " मला असं वाटतं, माझं असं मत आहे, ह्या धंद्यांत काळ्या केसांचे पाढरे केस झाले —" असें म्हटले की समोरच्याच्या मनावर दडपण पडलेंच पाहिजे. किती उपकारक आहेत पाढरे केस ! तुम्हीच सागा.

असें असून माझ्या न्हावीदादानें सागितल्याप्रमाणे काहीं लोक आपल्या पाढऱ्या झालेल्या किंवा होऊं पाहाणाऱ्या केसाना कलप लावून काळे करणारे आहेत ! आपलें तोंड चागले दिसावे, आपण लहान वयाचे आहोंत असें लोकाना भासावें म्हणून हे लोक कलप लावतात हें उघडच आहे. ह्यापैकीं काहीजणाचीं प्रथम लग्ने व्हायचीं असतात, कांहीं विधुर असतात, कांही इतर संधानें बांधण्यांत गुंतलेले असतात. ह्या सर्वांना पांढऱ्या केसाची अडचण भासत असेल ह्यांत शंका नाहीं. अशानीं खूप मोठ्या फायद्याच्या आशेनें एक वेळ

कलप लावला तर तो योग्य नाहीं पण क्षम्य ठरेल. लहान वय असूनही पांढऱ्या केसांमुळें समजा, तुमचे लग्न कुठें जमत नाहीं. अशा वेळीं एखादी मुलगी सांगून आली आणि तुम्ही तात्पुरता थोडासा कलप लावलात तर तो कदाचित् क्षम्य होईल. पण असलें कांहीं कारण असल्यावांचून आपले सुंदर पांढरे केस तुम्हीं काळे कां करावेत तें मला समजत नाहीं.

शिवाय असल्या कृत्रिम उपायानी सुंदर दिसण्याचा प्रयत्न करणें कांहींजणाना कसे आवडतें हेंच मला कळत नाहीं. कृत्रिम साधनानी आपल्या रूपांत भर घालणें किंवा आपली शारीरिक कुरूपता झाकून टाकणे ह्या दोन्ही गोष्टी मला तरी आवडत नाहींत. देवानें किंवा मातापितरानीं आपणाला जसें घडविलें असेल तशा स्थितींत नीटनेटकेपणानें आपण वागलें म्हणजे झालें. शारीरिक सौंदर्य हें बव्हंशी आपल्या स्वाधीन नाही; तें निसर्गदत्तच असतें. जी गोष्ट आपल्या हातचीच नाही तिच्यात उगीच बदल करण्याचा प्रयत्न करणें हें कांहीं योग्य नाहीं. इतकेंच नव्हे, तर तें हास्यास्पदही होण्याचा संभव असतो.

माझे एक वृद्ध मित्र आहेत. ते आपल्या डोक्याची तुळतुळीत हजामत करीत असल्यानें डोक्यावर कलप लावीत नाहींत. परंतु मिशाना कलप लावतात. एखादे वेळीं विस्मरणानें कलप लावायचा राहिला म्हणजे त्याच्या मिशा मोठ्या मजेशीर दिसतात. मिशांचा पुढचा भाग काळा आणि मागचा भाग पांढरा अशा वेळीं दिसूं लागतो आणि मग माझे मित्र एखाद्या विदूषकाप्रमाणें हास्यास्पद दिसूं लागतात.

आपण ह्या भानगडींत कधींच पडणार नाहीं. मला माझ्या पांढऱ्या केसांचा मुळींच तिटकारा नाही. असला तर थोडाफार प्रेमाचा आहे. माझ्या अनेक सुखस्वप्नांत पाढऱ्याशुभ्र दाढीचें सुखस्वप्न मोजायला कांहीं हरकत नाहीं. आपल्या डोक्यावरचे आणि तोंडावरचे सर्व केस बर्फाप्रमाणें पांढरे झाले आहेत, आपली पांढरी दाढी आपल्या छातीवर रुळते आहे, काळ्याभोर केसाचें चिमणें जग आपल्या आवर्तीभोवतीं खेळतें आहे आणि आपण शांत व प्रसन्न मुद्रेनें सर्वांकडे बघतों आहोंत — असलें स्वतःविषयींचें भविष्यकाळचें चित्र कल्पायला मला तरी फार आवडतें. आपणाला नाहीं आवडत ?

पंचवीस वर्षांनंतर

# बायकोचा राग

विवाहित स्त्री आणि तिचा राग हीं किती भयंकर असूं शकतात ह्याची जाणीव मला त्या दिवशी झाली. मी माझ्या मित्राकडे नेहमींच्या पद्धतीप्रमाणें संध्या-काळच्या शिळोपाच्या गप्पा मारण्याकरितां म्हणून गेलों होतों. घराजवळ जातांच घराचा नूर मला पालटलेला दिसला. नेहमी त्याच्या घरासमोर त्याची मुलें खेळतांना दिसत. आज त्याच्या घरासमोर एक घोडागाडी उभी असून तिचा घोडा फुरफुर करीत होता. जणूं काय धावूं लागायला तो अगदीं उत्सुक झाला होता. मुले कवायती कंपूप्रमाणें एका रांगेत पोशाख करून उभीं होतीं. अर्धवट आनंद, अर्धवट भीति – असल्या अर्धवट स्थितींत तोंडांचे चंबू करून तीं उभी होतीं. त्यांच्यामागे खिडकीजवळ त्यांची जन्मदात्री होती. तिचा चेहरा आरक्त म्हणजे लाल झालेला दिसत होता. भुवया दोरी ताणलेल्या धनु-ष्याप्रमाणें दिसत होत्या आणि नाकाच्या पाकळ्या रागामुळें स्फुरत होत्या. वहिनीसाहेब खूप रागावल्या आहेत हें मीं तेव्हांच ताडलें व त्यांना म्हणालों, “ का हो वहिनी, गरिबावर इतकी इतराजी ! ”

“ गरीब ! इथूनतिथून सर्व पुरुष अरेरावखोर आणि माणुसकीवांचूनचे ! ” रागाच्या स्वरांत वहिनीसाहेब उद्‌गारल्या. मी आणखी काहीं बोलणार होतों; पण फणकाऱ्यानें माझ्याकडे न बघता एका दगडाकडे त्या बघूं लागताच माझी किंमत मला कळून मी वर मित्राकडे गेलो. नेहमींप्रमाणें त्याच्याभोवतीं सुहृदांचा परिवार असून तो कपडे करीत असलेला मला आढळला. मी म्हणालो, “ राम, काय रे हें ? खालीं कायापालट झालेला दिसतो आहे आणि तूं अगदीं स्वस्थपणानें जामानिमा करतो आहेस ! ”

“ काय करूं रे ? आतून अगदीं रागाचा डोंब पेटला आहे; पण तिच्या म्हणण्याप्रमाणें करावं लागतं आहे. ” माझ्याजवळ येत हलक्या स्वरांत राम म्हणाला.

“ पण असं झालंय् काय ? ” मीं पृच्छा केली.

" तुमच्या कॉलेजच्या वेधशाळेतून अस्मानातील तारे बघण्याची हिला हुक्की आली आहे. इथें ही मित्रमंडळी जमली असताना मला बाहेर जाणं कसं आवडेल? मी नाहीं म्हणून पाहिलं. रोज तिचा हाच हट्ट असतो. आज तिनें गाडी मागवून आणि मुलाना तयार करून माझ्यामागें भुंगा लावला आहे."

" अस्सं ! अरे अरे अरे ! मग तुझ्या निश्चयाचा किल्ला जागेवर आहे कीं जमीनदोस्त ? "

" जमीनदोस्त. ऑफिसांत साहेबाला देखील चळचळां कापायला लावणारा मी आज बायकोसमोर चळचळां कापूं लागलो आहे ! गोगलगाय बनलों आहें." केविलवाण्या नजरेनें माझ्याकडे पाहात राम म्हणाला. तो आणखी कांहीं बोलायला धजणार होता. इतक्यांत खालून त्याच्या बायकोचा आवाज आला, " लग्नाचा पोशाख करणं चाललं आहे वाटतं ? " आणि मग " नाहीं नाहीं. हा आलोंच. " असें म्हणत आणि पुन्हा एकदा गरीब कोकराप्रमाणें आम्हां सर्वांकडे बघत आमचा मित्र बायकोला आणि मुलांना अस्मानातील गुरु-शनि दाखवायला म्हणून गाडींत बसून चालता झाला ! बिचारे आम्ही सर्व अर्थातच मग वाट फुटेल तिथें चालते झालों. माझ्या डोक्यात एकच कल्पना थैमान घालूं लागली– बायकोचा राग !

अगदीं पुरातन काळापासून विवाहित स्त्रियांचा हा भयंकरपणा चालत आला आहे. मंथरा, कैकेयी, सत्यभामा– हीं स्त्रियांच्या रागाची स्मारकेंच होत ! कैकेयीच्या रागामुळें रामाला वनवास भोगावा लागला आणि दशरथा-सारख्या वीराला खालीं तोंड घालून पुत्रशोकामुळें मरण स्वीकारावें लागलें ! शत्रूंच्या धनुष्याची दोरी तोडणाऱ्या दशरथाला बायकोची चढलेलीं भ्रूकुटें खालीं करण्याचें सामर्थ्य नव्हतें ! कैकेयीच्या रागाचा पारा जसजसा वर चढूं लागला तसतसा रामाबद्दल दशरथाला वाटणाऱ्या अनुरागाचा पारा खालीं जाऊन गोठूं लागला ! बायकोच्या रागानें बळी घेतलेला दशरथ हा पहिला पुरुष होय. सत्यभामेचा राग कांहीं कमी नव्हता ! श्रीकृष्णाला ती अशी नाचवीत असे, कीं कांहीं पुसूं नका ! कृष्ण हा राजकारणी व खिलाडू असल्यामुळें सत्यभामेच्या रागाला बळी पडण्याऐवजीं नव्या नव्या बायका करून तो तिचा

मत्सर वाढवीत असला तरी अन्तर्यामी तो सदैव घाबरलेला दिसे. भारतीय युद्धांत 'युक्तीच्या चार गोष्टी' सागण्याऐवजी प्रत्यक्ष हातात धनुष्य श्रीकृष्णानें न घेण्याचें कारण तरी– माझ्या मतानें–सत्यभामेचा राग हेंच होय.

मध्यंतरीच्या काळात स्त्रियाच्या ह्या भयंकरपणाचा भाव घसरत जाऊन त्याची जागा पुरुषी रागाने घेतली होती. मला वाटते, हा काळ वैराग्यशील बुद्धानंतरचा असावा. स्त्रियापासून दूर राहाणाऱ्या व स्त्रियाना रोगजंतूप्रमाणें वागविणाऱ्या ह्या धर्मसंस्थापकापासूनच्या काळांत पुरुषाचा भाव वाढूं लागला. जवळ येणाऱ्या प्रत्येक स्त्रीला तो बटकीप्रमाणे वागण्याच्या शर्तीवरच थारा देत असे. पायातल्या वहाणेप्रमाणें तो तिला आपल्या पायांखालीच ठेवीत असे. साहजिकच मग स्त्रियांत अशी म्हण सुरू झाली– 'कोणाचा होऊं नये चाकर आणि कोणाची होऊं नये बायको.'

पण आतां पुन्हा स्त्रियाचीच चलती सुरू झाली आहे. ह्या विसाव्या शतकांत स्त्रियाचा भाव भलताच वाढूं लागला आहे. वाढत्या स्त्रीशिक्षणामुळें म्हणा किंवा स्त्रीदाक्षिण्यामुळें म्हणा, लवकरच घरोघरीं कैकेयी-सत्यभामेचे छोटे छोटे अवतार दिसूं लागतील असा मला भरवसा वाटतो आणि मग आम्हां पुरुषांचें काय होणार आहे हें त्या स्त्रियांनाच माहीत! कांहीही झालें तरी शेवटीं आमच्यावांचून त्यांचें अडेलच अडेल – ह्या एकाच आशेवर पुरुषाना दम धरायला कांहीं हरकत नाही.

आणि आतां हें असेंच चालायचें. आपले पुरुष-पूर्वज आपल्या स्त्री-पूर्वजां-वर जसे रागावत असत; आपले बाबा आणि काका, मामा आणि आजोबा आपापल्या बायकावर जसे कडाडत असत; तसें कांही करणें आपणाला आतां साधायचें नाहीं. स्वयंनिर्णयाच्या सध्याच्या जमान्यांत आपला जनानखाना स्वतंत्र होण्याचा प्रयत्न अवश्य करणार. आपलें पुरुषी शहाणपण ह्यांत आहे, कीं लवकरच स्त्रियांना वसाहतीचें स्वराज्य किंवा निदान प्रांतिक स्वायत्तता देऊन टाकणे. तुम्हांला सुखाचा–आनंदाचा–प्रेमाचा संसार करायचा आहे ना? मग तुम्हीं स्त्रियांच्या रागाला अनुरागाइतकीच किंमत दिली पाहिजे.

तसें म्हटलें तर बायकांचा राग ही एक स्वाभाविकच गोष्ट नाहीं का? स्वसंरक्षणाच्या उपजत बुद्धीनेंच, मला वाटतें, स्त्रिया रागावत असाव्यात.

आपला मान आणि प्रतिष्ठा ह्या रागावण्यामुळेंच त्या राखूं शकतात. अर्थात् ह्यामुळें आपली थोडी किंवा बहुत गैरसोय होते. पण त्याला त्या काय करणार ?

बायको रागावलेली पाहिली की मला थंडीच्या दिवसांतील तडतडणाऱ्या कोळशांच्या शेगडीची आठवण होते. थंडीमुळे आपणाला शेगडीच्या उष्णतेची – उबाऱ्याची – जरुरी असते आणि म्हणून तिच्या जवळ, शक्य तितक्या जवळ बसावेंसें आपणाला वाटतें. पण ते तडतडणारे कोळसे आपणाला जवळही येऊं देत नाहीत. असा राग येतो अशा वेळीं आपणाला त्या कोळशांचा ! रागावलेल्या बायकोच्या बाबतीत असेंच होतें. आपणाला तिच्याजवळ जावेंसें वाटतें; पण तिचा राग जवळ येऊं देत नाही !

बायका ( अर्थात् लग्न झालेल्या ) केव्हां आणि कशा रागावतील ह्याचाही काहीं नेम नसतो. श्रावणातील ऊन-सावलीप्रमाणें त्याच्या स्वभावांत बदल होत असतो किंवा एखाद्या मांजरीप्रमाणें त्यांची स्थिति असते. म्यॉव म्यॉव करीत आपल्या पायाभोवती घोटाळणारी मांजरी गुर्रगुर्र करून केव्हां रागावेल ह्याचा काहीच नेम नसतो. आणि आपल्या अर्धांगीचा तरी कुठें असतो नेम ? साराच लहरींचा कारभार !

बायकाच्या रागात सामर्थ्य तरी केवढें असतें ! मला वाटतें स्त्रीची भ्रूकुटि जें काम करूं शकते तें काम राजदंडही करूं शकत नाहीं. राजदंडाच्या मागें सत्तेची दहशत असते, तर स्त्रियांच्या चढलेल्या भ्रूकुटीमागे प्रेमाची दहशत असते.

आणि तसें म्हटले तर एक प्रकारच्या अधिकारामुळेंच त्या रागावतात ना ? अधिकारावाचून कोण कोणावर रागावतो ? जिथें अधिकार आहे, अनुराग आहे, तिथेंच रागही संभवतो. “ भयंकर म्हटला तरी तो बायकोचा राग, त्याची गोडी काही और और आहे ” असें दुसरा माझा एक मित्र म्हणत असतो त्याचें कारण तरी हा एक प्रकारचा प्रेमाचा अधिकार हेंच होय. त्याची रागीट पण प्रेमळ बायको माहेरी गेली कीं त्याला मुळीं देखील करमत नाहीं. तुलसीदासाप्रमाणे तो तिच्यामागे पागल बनून जात नाहीं; पण यशवंतांच्या ( निराळ्या ठिकाणीं निराळ्या व्यक्तीला उद्देशून लिहिलेल्या ) ओळींचा उपयोग करून तो तिला चार-दोन दिवसातच पत्र पाठवून कळवितो, की—

**ये रागवावयाही, परि येइ येइ वेगें !**

पंचवीस वर्षांनंतर

## चौकटीवांचूनचीं चित्रें

कांहीं दिवसांपूर्वी एक मौजेची गोष्ट घडली. माझ्या मित्रानें पूर्वीचें बिऱ्हाड सोडून नव्या ठिकाणी बिऱ्हाड थाटलें होते. साहजिकच त्यानें मला आपली जागा बघण्याकरितां बोलाविलें. त्या वेळी त्याचें बिऱ्हाड आणि त्या बिऱ्हाडातील सर्व सामान पाहून मला फार आनंद झाला. घरातील सर्व वस्तु अशा रीतीनें व अशा ठिकाणीं ठेवण्यांत आल्या होत्या की त्या खुलून दिसाव्यात. माझ्या मित्रानें घर शृंगारण्यांत खूप पैसा खर्च केला असेल असें वाटून मी त्याला म्हणालों, " काय रे, कां ही खूप उधळपट्टी चालवली आहेस ? "

" कसली उधळपट्टी ? " त्याने आश्चर्याने विचारले.

" ह्या सर्व नव्या वस्तु आणण्याची. "

" असं होय ? " असें म्हणून माझा मित्र मोठ्यानें हसला आणि म्हणाला, " आलं माझ्या लक्षांत. मीं वस्तु कोणतीच नवी आणलेली नाहीं. सर्व वस्तु त्याच आहेत. फरक इतकाच आहे कीं जुन्या घरांत ज्या जिनसा शोभत नव्हत्या, उठावदार दिसत नव्हत्या, त्या नव्या घरांत शोभून दिसत आहेत, आकर्षक वाटत आहेत. चांगली जागा नसल्यामुळें कांही वस्तु मी पेटींतच ठेवल्या होत्या. त्या आतां बाहेर काढल्या आहेत. "

" अस्सं काय ! म्हणजे तुझ्या पूर्वीच्या घरांतील वस्तूंची स्थिति चौकटी-वांचूनच्या चित्रांसारखी होती म्हणायची. " मी म्हणालों.

" अगदीं बरोबर. "

आणि त्यानंतर परवां माझ्यावर हाच प्रयोग माझ्या एका मैत्रिणीकडून करण्यांत आला. मी माझ्या नव्या घरांत राहायला गेल्यावर प्रथमच ती मजकडे आली आणि घरातील एक एक वस्तु न्याहाळीत म्हणाली, " हा चहाचा संच तुम्हीं केव्हां खरीद केलांत ? हा गालिचा न् हे पडदे कुठून खरीद केलेत ? हीं चित्रं केव्हा मागवलींत ? ही फुलदाणी तरी किती छान आहे ! "

तिचें बोलणें ऐकून मनांतल्या मनांत मी हसलों व म्हणालों, "ह्या सर्व वस्तु जुन्याच आहेत."

"म्हणजे त्याही घरात ह्या होत्या?"

"होत्या तर."

"आश्चर्य आहे!"

"वस्तु होत्या; पण त्या चौकटीवांचूनच्या चित्रासारख्या होत्या. त्यांना योग्य पार्श्वभूमि मिळाला नव्हती, योग्य स्थान मिळालं नव्हतं. त्याच्या अभावी त्या असून नसल्यासारख्या होत्या."

माझ्या मैत्रिणीचें समाधान झाल्यासारखे दिसलें. कांही वेळ गप्पा मारून ती निघून गेली. ती गेल्यावर मी मनाशींच विचार करूं लागलों; आणि मग चौकटीवांचूनच्या अनेक बऱ्या वाईट चित्रांचे नमुने माझ्या समोर तरंगून येऊ लागले.

माझ्याबरोबर कॉलेजात शिकत असलेल्या एका कुरूप मुलीची मला आठवण झाली. ती रोज अंगावर मौल्यवान् वस्त्रें आणि अमोल अलंकार घालून येई. पण ते तिला मुळींच खुलून दिसत नसत. त्या वस्त्रांनीं आणि अलंकारांनीं ती सुशोभित दिसण्याऐवजी अधिकच विरूप दिसे. तिच्या तसल्या सोंगाकडे पाहून मला शिसारी येई. पण एकदा तिनें मौज केली. एरवीं कुरूप दिसणाऱ्या त्या मुलीनें त्या दिवशी एक सुंदर गोष्ट केली. तिनें आपल्या एका सुस्वरूप मैत्रिणीला स्वतःची वस्त्रें आणि अलंकार घालायला देऊन स्वतःबरोबर कॉलेजात आणली. आणि काय? त्या दिवशीं कॉलेजातील सर्व तारुण्य आणि रसिकता त्या पाहुण्या पोरीकडे पागल होऊन बघूं लागलीं. शेंडी धारण करणाऱ्या माझ्यासारख्या सनातन्यापासून तों दाढी धारण करणाऱ्या आमच्या प्रोफेसरापर्यंत सर्वांचें लक्ष त्या अजाण अबलेनें आपल्याकडे वेधून घेतलें. मला आठवण आली ह्या प्रसंगाची आणि तोंडांतून उद्‌गार निघाले, 'चौकटीवांचूनचें चित्र!'

माजी बादशहा आठवे एडवर्ड आणि हल्लीचे ड्यूक ऑफ विंडसर ह्यांचेंही मला स्मरण झालें. इतक्या विलोभनीय गुणाचा सत्पुरुष, पण त्याला आयुष्य

रितें रितें वाटत होतें. भिरभिर त्यानें जगभर भटकावें, सर्वांची वाहवा मिळवावी, पण अंतःकरणांत कुठल्या तरी तळमळीनें असंतुष्ट राहावें! शेवटीं आले ते सिंपसनबाईच्या सान्निध्यांत; आणि सुंदर चित्राला तितकीच सुंदर चौकट लाभावी त्याप्रमाणें त्याच्या आयुष्याचें सार्थक झालें. त्या सार्थकतेपुढें त्यानीं राज्याची किंवा साम्राज्याची पर्वा केली नाही.

आधुनिक काळांतील हिटलर, मुसोलिनी, डी. व्हॅलेरा, स्टॅलिन ह्यांच्या चरित्रांकडे पाहिलें असतांना असें आढळेल, कीं एके काळी हीं सर्व चौकटी-वांचूनचीं चित्रें होतीं. अंगीं सर्व प्रकारचे गुण असूनही योग्य परिस्थितीच्या अभावीं ही मंडळी पुढें येऊं शकली नाहीं. तीच, परिस्थितीची चौकट मिळाल्याबरोबर अधिक तेजानें तळपूं लागलीं. हिटलर काय किंवा मुसोलिनी काय, मानसिक सामर्थ्याच्या दृष्टीनें त्यांच्या पूर्वीच्या आयुष्यांत आणि नंतरच्या आयुष्यात काय फरक आहे? कांहीं विशेष नाहीं. फरक इतकाच, कीं काळ पालटल्यानें पुढें त्यांच्या गुणाचें चीज झालें. कोणी जासूद म्हणून, कोणी गवंडी म्हणून, कोणी शिपाई म्हणून किंवा कोणी शेतकरी म्हणून, एरवीं जनसंमर्दात झाकलीं जाणारी माणसें योग्य परिस्थिति मिळतांच, योग्य चौकट लाभतांच, कांही काळ का होईना, कशीं तेजस्वी दिसूं लागलीं त्याचीं हीं उदाहरणें होत.

आणि ह्यांची आठवण होतांच मला आपल्या देशाची आठवण झाली. पारतंत्र्याचा दुःखानुभव घेत असलेल्या ह्या भाग्यहीन देशांत कांहीं कमी का योग्यतेचे पुरुष निर्माण झाले आहेत? दादाभाई, टिळक, गांधी, जवाहरलाल, सुभाषचंद्र, सावरकर ह्यांसारखे अनेक स्वार्थत्यागी महाभाग ह्या देशांत जन्माला आले आहेत. ह्यांपैकीं कित्येकांनीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली आहे व दुसरे कित्येक करीत आहेत. दुसऱ्या एखाद्या स्वतंत्र राष्ट्रांत हे जन्माला येते तर त्यांनीं आपलें राष्ट्र उज्ज्वलतम बनविलें असतें. परंतु हिंदु-स्थानाच्या भूमींत म्हणून त्यांच्या प्रयत्नांना यावे तितकें यश येत नाहीं. बुद्धिमत्तेंत किंवा कर्तबगारींत हिटलर-मुसोलिनीला हार जातील असे हे लोक नाहींत. परंतु, परंतु काळ अनुकूल नाहीं, परिस्थिति पाहिजे तितकी उपकारक नाही. आणि म्हणूनच चौकटीवांचूनच्या चित्रांप्रमाणें आमच्या राष्ट्रधुरीणाची

स्थिति झालेली आहे. आमच्या राष्ट्रात रत्नें आहेत पण रत्नपारखी नाहीत; हिरे आहेत पण त्यांना मोल येत नाही.

ह्या लेख लिहीत असतांनाच माझ्याकडे माझा एक जुना विद्यार्थी मित्र येऊन भेटून गेला. फार कर्तबगार आणि गोड मुलगा आहे तो. मेकॅनिकल एंजिनियरची परीक्षा पास होऊन स्वतःच्या कल्पक मेंदूला काही वाव मिळाल्यास पाहावा म्हणून तो मुंबई इलाख्यांत सारखा धडपडतो आहे. आपल्या डोक्यांतील कितीतरी योजना त्याने मला सांगितल्या. त्या योजना आर्थिक दृष्ट्या फायदेशीर होतील असेही मला त्यानें पटवून दिलें. पण द्रव्याच्या नि संधीच्या अभावी आपले विचार जागच्याजागीच विरणार तर नाहींत ना, अशी आपणाला भीति वाटत असल्याचें त्यानें मला सांगितलें. चित्र तयार असावें पण बाजारात त्याला योग्य चौकट मिळूं नये, अशीच नाही का माझ्या मित्राची स्थिति झालेली? वाईट वाटलें मला, त्याची होत असलेली कुचंबणा पाहून.

असें सांगतात, कीं अमेरिकेतील जबाबदार व्यक्ति व संस्था आपल्या तरुणांची कुचंबणा होऊं देत नाहींत. राष्ट्रांतील बुद्धीचें भांडवल कधीच रिकामें तिथे आढळत नाही. सर्व गोष्टींना–सर्व प्रकारच्या कल्पकतेला, नावीन्याला-अमेरिकेंत वाव मिळतो, उत्तेजन मिळते. व्यक्ति तयार झाली की केलाच तिचा राष्ट्राच्या कारणीं उपयोग. चौकटींवाचूनची चित्रें अमेरिकेंत आढळणार नाहींत. स्वतंत्र राष्ट्र आणि परतंत्र राष्ट्र ह्यातील हाच नयनशल्यकारक फरक होय.

विविधतेनें भरलेला खंडोगणती कच्चा माल उत्पन्न करणारा हिंदुस्थान; सर जगदीश, सर चंद्रशेखर, टिळक, टागोर ह्यांसारखी विद्वद्रत्नें नि शोधक ह्यांना जन्म देणारा हिंदुस्थान; एलोरा, अजंटा, ताजसारख्या अभिमानास्पद कलाकृति धारण करणारा हिंदुस्थान; काश्मीर, दार्जिलिंग, उटकमंड ह्यांसारखे सृष्टिसौंदर्यानें नटलेले गिरि बाळगणारा हिंदुस्थान; गंगा, सिंधु, कावेरीनें पुनित केलेला हिंदुस्थान–पण नाहीं त्याला जगाच्या राजकारणांत मान कीं समाजकारणांत स्थान. तिकडे एखादा ठेंगू डॉलफसही युरोपांतील राजकारण आपल्या करांगुलीभोवतीं नाचवूं शकतो, पण आमच्या इकडील मोठ्या पुढाऱ्यांच्या अलोट आत्मयज्ञानें देखील जगाच्या राजकीय क्षेत्रांत लहानसें

आंदोलन उत्पन्न होऊं शकत नाहीं. ह्याचें कारण एकच–आमच्या इकडे सर्व चौकटीवांचूनची चित्रे आहेत.

ह्या विचारांनी मला काही बरें वाटलें नाहीं. मन म्हणालें, ह्या देशाची ही अशीच का कुचंबणा चालणार आहे? हृदयाच्या आतल्या कोपऱ्यांतून उत्तर आलें: छे, छे! असें कसें होईल? ज्या वेळीं येथील बुद्धिमत्ता स्थगित होणार नाहीं, कल्पकता काळवंडून जाणार नाहीं, स्फूर्ति निरुपयोगी ठरणार नाही, कला कोमेजणार नाही, राजकारण थंडावणार नाहीं असा दिवस लवकरच उजाडणार आहे. आणि तो भाग्याचा दिवस उगवला म्हणजे मात्र ह्या देशात चौकटीवाचूनची चित्रें दिसणार नाहीत. *

---

* स्वातंत्र्यपूर्व काळांत हा लेख लिहिला गेला. आतां परिस्थिति पुष्कळच पालटली आहे हें उघड आहे.

# पुरुषांच्या हातांतील बाहुल्या !

एकोणिसाव्या शतकात औद्योगिक, वैज्ञानिक इत्यादि ज्या कांहीं क्रान्त्या झाल्या त्यात महिलाच्या क्रान्तीला साहजिकच महत्त्व दिलें जातें. एखाद्या विषारी औषधाच्या गुंगींत माणसानें पडून राहावें, त्याप्रमाणें कित्येक शतकें पराधीनतेंत-परवशतेंत स्त्रिया पडून राहिल्या होत्या. प्रभातकालीन वाऱ्यानें वेली जागृत व्हाव्यात, हालूं-डोलूं लागाव्यात त्याप्रमाणें एकोणिसाव्या शतकांत स्त्रिया खडबडून जाग्या झाल्या आणि आमचीं मते, आमचे हक्क, आमची समानता, आमचा मान इत्यादि शब्दाच्या भूपाळ्या गाऊं लागल्या. स्त्रियाच्या सभा भरूं लागल्या, स्त्रियांच्या शाळा निघाल्या, स्त्रियाच्या संस्था चालू झाल्या, स्त्रियांची वर्तमानपत्रे सुरू झालीं. कधी वर मान करून न पाहाणाऱ्या स्त्रिया मारक्या म्हशीच्या डोळ्यांनीं पुरुषांकडे बघूं लागल्या, त्याच्याशीं भांडूं लागल्या, वादाविवाद करूं लागल्या, त्याना दे माय धरणी ठाय असें वदायला लावूं लागल्या. तात्पर्य, पुरुषांना किंवा ह्या मेल्या पुरुषाना जेरीस आणून काही हक्क, बरीचशी समानता महिलानी मिळविली.

× × ×

आणि हें सर्व स्त्रियांनीं ठीक केलें असें माझें मत आहे. ज्या भल्याबुऱ्या दिशांनीं त्यांनीं प्रयत्न केले ते सर्व निःसंशय अभिनंदनीय आहेत. पुरुषाच्या बरोबरीचें स्थान स्त्रियाना केव्हाही मिळायला हवें. विद्या, कला, व्यापार, उद्योग, राजकारण, समाजकारण, व धर्मकारण इत्यादि सर्व क्षेत्रांत त्यांना पुरुषांप्रमाणेंच संचार करतां आला पाहिजे. पुरुषांना जशा प्रकारें स्वातंत्र्य मिळतें, अगदीं तशाच प्रकारचे स्वातंत्र्य स्त्रियांना मिळायला हवें. नुसतें विचारांचें स्वातंत्र्य नाहीं, तर आचाराचें आणि उच्चाराचेंही स्वातंत्र्य स्त्रियांना मिळालें पाहिजे. पुरुष सांगतील तसें वागायचें, ते बोलतील तें ऐकायचें, ते ठेवतील तसें राहायचें असली निंद्य पराधीनता स्त्रियांच्या पदरीं नसावी हेंच उचित. स्त्रियांची सर्वांगीण उन्नति स्वातंत्र्याच्या ऊबदार हवेंत जशी होऊं शकेल, तशी परवशतेच्या कोंदट–दमट हवेंत कधींही होणार नाहीं. ज्या

ज्या स्त्रियांनीं बंडाचा झेंडा उभारून स्त्रियांच्या हक्कांकरितां सैतानी पुरुषाशीं भांडण केलें, त्या त्या सर्व महाभाग महिलांबद्दल माझ्या मनांत सदैव आदरच वसत आला आहे. धन्य होत त्या स्त्रिया !

× × ×

घरांतल्या गोष्टी बाहेर काय सांगाव्या ? पण सागतोच. वाचकानी कृपा करून पुन्हा आपापल्या घरांत मात्र त्या सांगूं नयेत. ज्या ज्या वेळीं मी सौभाग्यवतीला एखादें काम सांगतो त्या त्या वेळी ती तें करण्याविषयी नापसंती दर्शविते, किंवा क्वचित् काहीं तरी सबब काढून तें करायचें टाळतें. अशा वेळीं मला साहजिकच प्रथम ठीक वाटत नाहीं. परंतु स्वातंत्र्येच्छु स्त्रियांनी असें नाही तर कसें वागायचें असा विचार माझ्या मनात येतांच तिच्याविषयी मला धन्यता वाटूं लागते. आणि मग बरीचशीं माझीं कामें मीच करतों. पूर्वीच्या स्त्रियांत–म्हणजे आपल्या मायमावश्यांत–आणि आधुनिक स्त्रियांत म्हणजे आपल्या बायकोबहिणींत–एक तफावत पडलेली सर्व जाणत्या पुरुषांच्या लक्षात आली असेल. पूर्वीच्या त्या थोर स्त्रिया आपल्या तोंडांतून शब्द निघण्याचा अवकाश, आपल्याकरितां वाटेल ते कष्ट करायला तयार असत. आपल्या आधुनिक स्त्रियांकडून असली कांहीं अपेक्षा करणें अगदीच रानटी स्वरूपाचें ठरेल. ह्या बाबतींत स्त्रियानीं जी प्रगति दाखविली आहे ती पाहून स्त्रियांचा भविष्यकाळ फार उज्ज्वल स्वरूपाचा आहे असें मला पुष्कळ वेळां वाटतें.

× × ×

परंतु अगदीं अलीकडे मला अशी भीति वाटूं लागली आहे, कीं स्त्रियाच्या बाबतींत मला वाटत असलेल्या आशा कदाचित् विफल ठरण्याचा संभव आहे. गेल्या शंभर वर्षांत स्त्रिया जशा प्रकारें वागत होत्या, तशा प्रकारें अलीकडे त्या वागेनाशा झाल्या आहेत. बेगुमानपणें, बेदरकारपणें, बेदिक्कतपणें, बेछूटपणें वागणाऱ्या आणि स्वतःला आधुनिक म्हणविणाऱ्या स्त्रिया एकाएकी कांही वेगळ्याच तऱ्हेनें वागूं लागल्या आहेत. पुरुषाची मुळींच पर्वा न करणाऱ्या आणि म्हणून 'पुरुषी' बनत चाललेल्या स्त्रिया एकाएकीं पुरुषाच्या नजरेंत भरण्याकरिता करीत असलेले प्रयत्न पाहून मला तर त्यांची कींव करावीशी

पुरुषांच्या हातांतील बाहुल्या !

वाटते. गेल्या दहा वर्षांतील स्त्रियांच्या शरीर-प्रसाधनाच्या वाढत्या खटाटोपाकडे पाहिलें असताना मला असें वाटतें, कीं स्वातंत्र्य आणि समानतेची इच्छा करणाऱ्या स्त्रिया पुन्हा एकवार पुरुषांच्या हातांतील बाहुल्या बनत चालल्या आहेत ! अगदी कचकड्याच्या बाहुल्या बनत चालल्या आहेत.

× × ×

आपण कोणतेंही वर्तमानपत्र किंवा मासिक उघडून त्यांतील जाहिरातीवरून ओझरती नजर टाका. आपणाला असें आढळेल, की स्त्रियाच्या शरीर-प्रसाधनाकरिता उपयोगीं पडणाऱ्या वस्तूंच्या जाहिराती त्यात वाढत्या प्रमाणावर आहेत. केस लाब व विपुल करण्याकरितां उपयोगी पडणारीं औषधें, सडपातळ होण्याकरितां औषधें, त्वचा तुकतुकीत व आकर्षक दिसण्याकरितां औषधें, स्तन गुबगुबीत होण्याकरितां उपयोगी पडणाऱ्या चोळया व औषधें इत्यादि वस्तूंच्या जाहिरातींकडे आणि बाजारात ह्या वस्तूंच्या वाढत्या खपाकडे पाहिले असताना माझें मन साहजिकच फार विचारमग्न होते. ह्याखेरीज ओठ, भुवया व नखे ह्यांच्या प्रसाधनाकरितां कांही रंग व औषधें मिळतात व खपतात ती वेगळींच. ह्या सर्व जिनसांचा स्त्रिया हल्ली मोठ्या प्रमाणावर उपयोग करीत आहेत आणि त्यामुळें कांहीं अंशानें त्या पूर्वीपेक्षां अधिक आकर्षक व विलोभनीय दिसूं लागल्या आहेत हें खरें आहे. आम्हां पुरुषांच्या दृष्टीने ह्यात काही वावगें नसून आमची त्यामुळें करमणूक होते हें कबूल केलें पाहिजे. पण खुद्द स्त्रियाच्या दृष्टीनें— बौद्धिक, सांस्कृतिक, वैचारिक क्षेत्रात पुरुषाच्या बरोबरीनें स्पर्धा करूं इच्छिणाऱ्या स्त्रियांच्या दृष्टीनें— मला त्यांना असे विचारावेंसें वाटते, की शरीरप्रसाधनांत जर तुम्ही इतका वेळ घालवूं लागलात तर आमच्याशी तुम्ही बौद्धिक व इतर क्षेत्रात टिकाव कशा धरूं शकाल ? शारीरिक सौंदर्याची तर जरूरी आहेच. पण त्याच्याच संवर्धनात जर तुमचे तासन् तास जाऊं लागले तर मानसिक सौंदर्य तुम्ही केव्हां प्राप्त करणार ? पुरुषाच्या भोवतीं आपल्या आकर्षणाचीं जाळीं तुम्ही किती दिवस पसरीत बसणार ? तुमच्यापैकीं काहीं छद्मी स्त्रिया असें म्हणतील, कीं आम्ही जो नट्टापट्टा करतों तो आमच्या स्वतःच्या आनंदाकरितां. माझें त्यांना उलट

विचारणें आहे, कां खरोखरींच का हें असे करता? माझी खात्री आहे, की त्यांचें मन त्याना निराळेंच उत्तर देईल.

× × ×

वर प्रदर्शित केलेल्या विचारांवरून स्त्रियाच्या शरीरप्रसाधनाविरुद्ध मी आहें असें समजण्याचें काहीच कारण नाही. अमुक एका हद्दीपर्यंत स्त्रियानी व पुरुषांनीं आपल्या शरीराकडे लक्ष पुरवून तें नीटनेटकें दिसेल अशी व्यवस्था केलीच पाहिजे. पण आपला बराचसा वेळ त्यांत जाता उपयोगाचा नाहीं. काही काहीं स्त्रिया सभास्थानी देखील आरशांत आपलें तोंड बघून आपण वाईट तर दिसत नाहीं ना ह्या फिकिरीत पडलेल्या मीं पाहिल्या आहेत! त्यांच्या मनावर ह्या गोष्टीमुळें केवढा ताण बसत असेल ह्याची कल्पना सहज येऊं शकेल. ह्याच कारणाकरिता शरीरप्रसाधनाचा बडेजाव माजवूं नये असें माझें म्हणणें. आपण म्हणजे केवळ शरीर नसून शरीर व मन असे दोन्ही आहोंत. त्यामुळे कोणत्याही एका गोष्टीवर भर न देतां, दोन्ही बाजूचें सारखेंच संवर्धन झालें पाहिजे.

× × ×

आज मी माझ्यासभोवती पाहातों तर कांहीं थोड्या अंशानी इतर स्त्रियांना पण मुख्यतः पुरुषांना आपण विलोभनीय दिसावें ह्या खटपटींत आणि खटाटोपांत पडलेल्या हजारों स्त्रिया मला दिसतात आणि माझ्या मनांत प्रश्न उभा राहातो: खरोखरीच स्त्रियाची प्रगति किंवा सुधारणा होते आहे काय? कीं स्त्रिया पुरुषांच्या हातांतील अजूनही बाहुल्या असून ते नटवतील तशा नटताहेत, त्यांना आवडेल तशा वागताहेत?

# कवि आणि फिनाईल !

मी आणि माझा मित्र एका काचसामान-विक्रेत्याच्या दुकानांत परवांच्या दिवशी बसलों असताना आमचे स्थानिक कवि कन्हैया हे तेथें आले आणि म्हणाले, " शेठसाहेब, फिनाईलचा भाव काय ?"

त्याचा प्रश्न ऐकून मी, माझा मित्र आणि दुकानदार तिघेही हसूं लागलों. माझें हसणें मी लवकरच आवरतें घेतलें पण माझा मित्र आपलें हसणें कांहीं थाबवीना. त्यांत दुकानदारानें विचारलें, " फिनाईलचा भाव काचसामानाच्या दुकानात ? " मग काय पुसता ? माझ्या मित्रानें मर्यादा सोडून हसायला सुरुवात केली !

त्याच्या हसण्यातील खोंच समजण्याइतकीही लबाडी कवि कन्हैया ह्यांच्या ठिकाणी नसल्यानें ते सरळपणानें म्हणाले, " अहो, ह्या डासानी किती बेजार केलें आहे म्हणून सागू ? गेल्या पंधरा दिवसात एक कविता झाली असेल तर शपथ ! रात्री स्फूर्ति आल्यासारखी वाटून काव्य करायला बसावें तो ह्याचा गुणगुणाट सुरू ! सर्वांगाला डास डसत असता, आलेली स्फूर्ति थंडगार पडते आणि आमच्या अंगाची नुसती लाही होते ! "

" वाहवा ! किती उत्तम विषय काव्याला ! शरीराचा स्टोव्ह पेटला आहे, पण स्फूर्तीची आईसक्रीम झाली आहे ! विरोधाचं किती सुंदर उदाहरण ! " माझा मित्र कवि कन्हैया ह्यांना उद्देशून म्हणाला.

" तुम्हाला थट्टा करायला काय जातं ? माझ्यासारखे डास चावले म्हणजे कळेल इंगा. मग इथें नाही मिळत तर फिनाईल ? " कवि कन्हैया ह्यांनीं काकुळतीनें विचारलें.

कविराजाना आणखीही कांहीं बोलून चिडविण्याच्या हेतूनें माझ्या मित्राचे ओठ स्फुरत असलेले पाहून मी म्हणालों, " कविराज, आपणाला फिनाईल हवं आहे ना ? "

" अहो हवें म्हणून काय विचारतां ? एकदम हवें आहे. "

" मग त्या समोरच्या औषधविक्रेत्याच्या दुकानात जा. तिथें तुम्हांला फिनाईल मिळेल. "

" असं काय ? भलत्याच दुकानी आलों होतो म्हणायचा ! माफ करा हं. " नमस्कार करीत कवि कन्हैया म्हणाले आणि ते समोरच्या दुकानाकडे गेले.

* * *

ते गेल्यावर माझा मित्र उद्‌गारला, " कवि आणि फिनाईल ! "

" का, काय झाल ? " मी विचारलें.

" कवि आणि फिनाईल, जरा विचित्र वाटते जोडी ! कवि आणि कामिनी, कवि आणि फुले, कवि आणि आकाश, कवि आणि नदी, कवि आणि सागर, इत्यादि जोड्या ठीक दिसतात. पण कवि आणि फिनाईल हो संगत काहीं मनाला बरी वाटत नाहीं. कवि आणि कादे, कवि आणि म्हातारी, कवि आणि कोंबडी ह्या जोड्यासारखीच कवि आणि फिनाईल ही जोडी वाटते ! इंद्र आणि अमृत ही जोडी स्वाभाविक वाटते, पण इंद्र आणि काडीचिराइतीचा काढा ही जोडी कर्णकटु वाटते."

" परिणामी अमृताप्रमाणें ठरणारी काडीचिराईत आणि इंद्र हीही जोडी काही वाईट नाही " असें मी म्हणालो. पण माझ्या मित्राचें तेवढ्यानें समाधान कोठलें व्हायला ! त्याच्या मनाने काही संकेत बांधून ठेवलेले आहेत आणि त्याविरुद्ध काही झालें की ती गोष्ट त्याला हास्यविषय होते.

कवि आणि काही गोष्टी ह्यांचा नित्यसंबध त्याच्या मनानें कल्पिलेला आहे. कवीनें नदीच्या काठाकाठाने रानावनातून हिंडावें, मिळतील ती फळें खावी, दिसतील त्या विषयांवर काव्ये करावीं, आढळतील तेवढ्या स्त्रियांवर प्रेम करावें, नाढळतील तेवढ्याच्या नावानें उसासे टाकावे, इंद्रधनुष्याचे रंग गोळा करावे, ढगांच्या मागें धावावें आणि सुवासाचा वेध घ्यावा. अशा काव्यमय गोष्टीच्या सान्निध्यातच कवीने आपला वेळ घालविलेला माझ्या मित्राला पसंत आहे. ह्या गोष्टी सोडून जरा खालच्या पातळीवर, जरा जगातल्या इतर लोकांसारखा कवि वागूं म्हणेल तर ते त्याला कधीच पटायचें नाहीं, कधीच रुचायचें नाही. कवि कन्हैया ह्यानीं फिनाईलची चौकशी करतांच त्याला ती

रुचली नाही ह्याचे कारण तरी हेच ! त्यांनी काचसामान–विक्रेत्याच्या दुकानात येऊन 'येथे मोत्याचा चारा खाणारा सोनियाचा राजहंस मिळतो का ?' म्हणून विचारलें असते तर ते माझ्या मित्राला गैर वाटले नसते ! पण फिनाईल-सारख्या अगदी साध्या, गद्य नि रुक्ष वस्तूची मागणी आमच्या कवींनी केल्यामुळे त्याच्या मनाला एक प्रकारे धक्का बसला !

* * *

अशा प्रकारचा धक्का पुष्कळांना पुष्कळांच्या बाबतीत अकारण बसत असलेला मी पाहिला आहे. तात्यासाहेब केळकर आपल्या नातवंडाशी खेळत असलेले पाहून एका गृहस्थाने माझ्याजवळ आश्चर्य प्रगट केले होते ! गंभीरपणे तो मला म्हणाला, "काय म्हणावं आमच्या तात्यासाहेबांना ! राजकारणाचा खेळ खेळायचा सोडून पोराशी पोरखेळ चालवतात हे !" सकाळी उठून शिऱ्याची वाटी पोटात रिचविणाऱ्या आणि सिनेमागृहात शेंगदाणे फाकणाऱ्या भालाकार भाऊसाहेब भोपटकर ह्यांच्याविषयी देखील काहींकांना असेच आश्चर्य वाटे. देशभक्त विठ्ठलभाई पटेल गुडगुडी ओढत असत. लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे ते अध्यक्ष असताना एक गृहस्थ त्यांच्या घरी त्यांना भेटायला गेले. त्या वेळी गादीवर तक्क्याला टेकून गुडगुडी ओढण्यांत विठ्ठलभाई दंग झाले होते. त्या स्थितीत त्यांना पाहून त्या भल्या गृहस्थाला इतका जबर धक्का बसला, कीं मागल्या पावलींच तो परत गेला ! ज्यांनीं कवितारति, काय हो चमत्कार, गोदागौरव ह्यासारखी नितान्त सुंदर काव्यें निर्माण केलीं, त्या चंद्रशेखर कवींना आपला सदरा धूत असताना पाहून एका कोमलहृदय वाचकाला झीट आल्याचें वर्तमान स्वतः कवींनी मला सांगितलें होतें ! आमचे एक प्रोफेसर आपल्या राजस बालकांना आपल्यापुढें सायकलीच्या दांड्यावर बसवून सायकल चालवीत असलेले पाहून पोराचा आणि पोरीचा तांडा जागच्या जागीं स्तिमित झालेला मी पाहिला आहे.

* * *

आणि ह्या प्रत्येक वेळीं मी माझ्या मनाशी त्याचें कारण शोधून काढण्याचा प्रयत्न केला आहे. आपण ज्यांना मोठे समजतों त्यांच्या ठिकाणी 'आपल्याच सारख्या सामान्य भावना, सामान्य आवडीनिवडी, सामान्य कल्पना असतात,

किंवा असणें शक्य आहे, हे पुष्कळाच्या लक्षांत येत नाही. राजा, पुढारी, लोकनायक, वक्ता, लेखक, कवि, कलावंत, संशोधक, ह्या सर्वांच्या ठिकाणीं जसे काही असामान्य गुण असतात आणि त्यामुळें ते इतराच्यापेक्षां फारच वेगळी कामगिरी करून दाखवतात, तसेच त्याच्या ठिकाणी पुष्कळ सामान्य गुणही असतात. आणि त्यामुळे ते पुष्कळ बाबतीत अगदी सामान्य स्त्रीपुरुषा-सारखे वागताना आढळतात. पण ही गोष्ट सर्वसामान्य मनुष्याच्या लक्षात न येऊन, त्याच्यापेक्षा जरा वरच्या श्रेणीच्या मनुष्याने त्याच्यासारखें वर्तन करताच त्याला साहजिकच एक प्रकारचा धक्का बसतो.

* * *

अशा प्रकारचा धक्का पाश्चात्य देशातील लोकाना बसत नाही. ह्याचें कारण सामान्य प्रकारची वागणूक असणारे, असामान्य योग्यतेचे पुरुष त्या देशांत पुष्कळ असतात. तिकडच्या मुख्य प्रधानाला सामान्य मनुष्याबरोबर बोलायला किंवा सिगरेट ओढायला कधीही कमीपणा वाटत नाहीं, आपलें सामान आपण उचलण्यात, आपली कामे आपण करण्यात, मोठ्या अधिकाऱ्यांनाही तिकडे काही वाटत नाही. अधिकाराच्या किंवा कर्तव्याच्या खुर्चीवर बसला की तेवढ्यापुरता तिकडचा मनुष्य काय वेगळा भासेल तेवढाच. बाकी सर्व त्याचे व्यवहार अगदी सामान्य माणसासारखे असतात. त्याचे बोलणें, हसणें, खाणें, पिणे, नाचणे, फिरणें, दुपारचा लंच घेणे, संध्याकाळी सिनेमा बघणें इत्यादि सर्व गोष्टी इतराच्याबरोबर व त्याच्याच पद्धतीनें त्याच्या होत असतात. आणि म्हणून विन्स्टन चर्चिलसारखा पुढारी एखाद्या सामान्य रेस्टॉरंटमध्ये स्त्रीच्याबरोबर काही पेय घेत बसलेला लोकाना दिसला तरी त्याचे लोकाना काहीं न वाटतां उलट कौतुकच वाटेल. आपल्या इकडे एखादा मंत्रि जर मुंबईच्या एखाद्या हॉटेलमध्यें वर उल्लेखलेल्या सारख्या परिस्थितीत बसलेला आढळला तर माझी खात्री आहे, की असंख्य लोकांना मूर्च्छा येऊन ते फुटपाथवर पडल्यावाचून राहाणार नाहींत !

* * *

ही परिस्थिति पालटायची असल्यास त्याला एकच रामबाण उपाय आहे. लोक ज्याना मोठे समजतात अशानी मोठेपणाच्या खोट्या नि दांभिक कल्पना

उराशीं बाळगून न वागतां सामान्य माणसांप्रमाणें मोकळेपणानें आपले सर्वसामान्य व्यवहार करीत जावें. अशा वागणुकीनें त्यांना वाटले तर बरेंच वाटेल. लोक काय म्हणतील ह्या भाराखालीं आपल्या मनातील सर्व प्रामाणिक भावना ह्या बिचाऱ्या मोठ्या लोकाना दडपून टाकाव्या लागतात. कांहींही त्यांना आपल्या मनाप्रमाणें करता येत नाही. त्याच्याविषयीं लोकाची जशी काय समजूत असेल तशी वागणूक त्यांना ठेवावी लागते. माझी खात्री आहे कीं त्यांना आपलें जिणें असह्य होत असेल. अशा लोकानी सामान्य मनुष्याप्रमाणें वागायचें ठरविल्यास त्याना नवीनच उल्हास प्राप्त झाल्यासारखें वाटेल, आयुष्यांत आनंदाचा नवीन झरा निर्माण झाल्याचें प्रत्ययास येईल.

ह्या दृष्टीनें एका अभिनंदनीय गोष्टीचा उल्लेख करायला हरकत नाहीं. हल्ली बरेचसे प्रथितयश लेखक अगदी बेफिकीर वृत्तीनें आपले नित्याचे व्यवहार किंवा धंदे पार पाडीत असलेले आढळतात. एखाद्या कॉलेजकुमारीबरोबर रेस्टोरांमध्यें चहा घेणें, एखाद्या सिनेमानटीबरोबर हिंडणे, मुलाबरोबर सायकलीवरून फिरणें, नाटकांत काम करणे इत्यादि बरेचसे व्यवहार आतां मोकळेपणानें नव्या विचाराचीं मोठी माणसें करूं लागलीं आहेत. कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर असल्या बाबतींत अगदीं गुंडासारखे ( अर्थात् चांगल्या अर्थानें ) वागत. बुधवार चौकाच्या भर रस्त्यांत टांग्यांत बसून भजी आणि चहा घेतांना त्यांनी सदाशिव पेठेंतील सोवळया जीवाना काय वाटेल ह्याची पर्वा कधींच केली नाही आणि त्यांच्या यशाचें हेंच मर्म होतें.

मोठ्या लोकाना सामान्य भावना असतात हे त्यानी फार चांगल्या प्रकारें लोकांच्या निदर्शनास आणलें. कवि झाला तरी तो ह्या जगांतच राहात असतो, आणि आपणाला जसा डासाचा उपद्रव होतो तसा त्यालाही होत असेल, एवढी साधी गोष्ट माझ्या मित्राच्या लक्षांत न आल्यानें त्याच्या हातून न कळत आमच्या कवीचा अपमान झाला. पण ह्याला उपाय म्हणजे कवींनी अधिकाधिक सामान्य माणसाप्रमाणेंच वागणें हा होय. कवीनें फिनाईलच्या शोधार्थ हिंडणें हेंच श्रेयस्कर.

# स्त्रीस्वातंत्र्याचीं स्थित्यंतरें

इतिहासपूर्वकालीन स्त्रियाची स्थिति आणि आजची स्त्रियाची स्थिति ह्यांकडे पाहिले असतांना दोहोत जमीनअस्मानाचा फरक असलेला आढळतो. भूकंपासारख्या उत्पातानें सृष्टीच्या स्वरूपांत ओळखूं न येण्याजोगा फरक घडावा, त्याप्रमाणें वैचारिक उत्पातानें मानवसमाजांतही ओळख न पटण्याजोगे काहीं बदल घडून आले आहेत. असल्या बदलात स्त्रियांना प्राप्त झालेल्या पराधीनतेचा प्रामुख्यानें निर्देश केला पाहिजे. सर्वसामान्यपणें जगभर स्त्रियांचा आजचा दर्जा पाहिला तर तो दासीचाच आढळेल. गेल्या पाऊणशे वर्षांत ही स्थिति पालटण्याचे निरनिराळ्या देशात चाललेले प्रयत्न जमेस धरूनही असें म्हणायला मला काही चिंता वाटत नाही, की अजूनही स्त्री ही पुरुषाची गुलाम किंवा दासी म्हणून मिरवत आहे ! इतकेंच नाही तर त्या स्थितींत राहूं इच्छीत आहे ! नव्हे, त्यात नकळत का होईना, धन्यता मानीत आहे !

पण मुळांत असली अपमानास्पद आत्मघातकी स्थिति स्त्रियांची कधींच नव्हती. एक काळ असा होता — आणि तो काळही काहीं लहानसहान नव्हता — ज्या वेळीं स्त्रिया नुसत्या स्वतंत्रच होत्या असें नव्हे, तर त्यांची पुरुषावर हुकमत चालत असे. त्या वेळी पुरुषाना स्त्रियाची मनधरणी करावी लागे. त्यांची प्रीति संपादन करावी लागे. त्याच्या नजरेत भरावें लागे. ओठांना रंग, गालांना पावडर आणि केसांना गंगावन लावून पुरुषांच्या नजरेंत भरण्याचा जो प्रयत्न आज स्त्रियांना करावा लागतो, तो एके काळीं पुरुषांना करावा लागे. चामडीला रंग, शरीराला पिसें आणि डोक्यावर कृत्रिम केस लावून पुरुषाला स्त्रीची प्रीति प्राप्त करावी लागे ! आणि प्रीति प्राप्त झाल्यावरही, ती टिकविण्याकरिता त्याचा जीव अगदी मेटाकुटीस येई. पुरुषांची काय भयंकर स्थिति त्या वेळीं होत असेल त्याची आज कल्पनाच करायची असल्यास, आजच्या स्त्रियांच्या स्थितीकडे पाहावें.

पण पुढें ज्या वेळीं कुटुंबसंस्था अस्तित्वांत आली आणि स्त्रीच्या पोषणाची व संरक्षणाची जबाबदारी पुरुषानें आपल्या शिरावर घेतली त्या काळी फार मोठी वैचारिक क्रांति घडून आली. स्त्रीनें पुरुषाशी इमानानें वागले पाहिजे, एकनिष्ठ राहिले पाहिजे, त्याची सेवा करण्यातच कृतार्थता मानली पाहिजे, कारण पति हा स्त्रीचे दैवत होय, त्याची मर्जी संपादन केल्यानें ईश्वराची मर्जी संपादन केली जाते, इत्यादि मते ह्याच काळात प्रसृत होऊन, त्यांना धर्मग्रंथांत कायमचें स्थान देण्यात आलें. साहजिकच मग स्त्रीनें पतिपरायण असलें पाहिजे, पातिव्रत्याचें रक्षण केले पाहिजे, तोच पति पुन्हा पुन्हा लाभावा म्हणून धार्मिक व्रतें केली पाहिजेत अशा प्रकारचीं तत्त्वे रूढ झालीं. ह्यांत पुरुषाच्या दृष्टीनें सर्व उत्तम झालें. स्त्री सोडून जाण्याची त्याची भीति कमी झाली. तो निष्काळजी बनला; इतकेंच नाही तर धर्माज्ञेचा पाठिंबा मिळताच, त्याचा दुरुपयोग करून, स्त्रीला हर प्रकारें आपल्या ताब्यात आणि सत्तेत ठेवूं लागला. एके काळी तो जो तिचा गुलाम होता, त्याच्याऐवजीं तिला त्यानें आपली दासी बनविली !

पुरुषानें स्त्रीचें दास बनणें काय किंवा स्त्रीनें पुरुषाची दासी बनणें काय— ह्या दोन्ही अवस्था परस्पराच्या प्रगतीच्या दृष्टीनें अत्यंत हानिकारक होत. स्त्री काय किंवा पुरुष काय, दोघांचीही प्रगति आणि वाढ स्वातंत्र्याच्या आणि उत्तेजनाच्या ऊबदार वातावरणात जशी होऊं शकेल, तशी ती पराधीनतेच्या कोंदट वातावरणांत होणें कधींही शक्य नाहीं. स्त्रीच्या दास्यातून पुरुषाने आपली सुटका करून घेतली खरी, पण सासुरवास सहन केलेल्या सुनेनें स्वतः सासू झाल्यावर आपल्या सुनेला छळावें, त्याप्रमाणें स्वतंत्र झालेल्या पुरुषानें स्त्रीला छळायला ( होय, छळायलाच नाहीतर काय ) सुरुवात केली. समंजस सासू ज्या प्रकारचा दिलदारपणा दाखवते, तशा प्रकारच्या दिलदारपणाची अपेक्षा त्या काळच्या पुरुषाकडून करणें अयोग्यच ठरेल. त्यानें दिलदारपणा तर दाखविला नाहींच, उलट एकतर्फी नीतिनियम करून तिची सर्व बाजूंनीं वाढ खुंटवून टाकली. निसर्गानें स्त्रियांच्या बाबतींत उत्पन्न केलेल्या अडचणींच्या जोडीला त्याची आर्थिक पराधीनता आल्यानें तर, स्त्रियांच्या सर्वांगीण प्रगतीचा मार्ग अजिबात बंद झाल्यासारखें झालें. ह्याचा परिणाम

असा झाला कीं बौद्धिक, मानसिक, शारीरिक सर्व बाजूंनीं स्त्रियांची वाढ खुंटली. मनांतले विचार मनात गाडलेल्या, हृदयांतल्या भावना हृदयांत चुरडलेल्या, शरीरातल्या वेदना शरीरातच जिरवलेल्या स्त्रियाच्या पिढ्या निर्माण होऊं लागल्या. राजसत्ता, पितृसत्ता, चालत असलेल्या त्या काळांत पतिसत्ता तितकीच जोरदार असणार. असे सागतात, की झारशाहीच्या काळांतील रशियांत सासरा आपल्या जांवयाला लग्नाची भेट म्हणून एक चाबूक अर्पण करी. हा चाबूक लग्नाच्या दिवशी वधूवराच्या मंचकावर लटकविण्यात येत असे. नवऱ्याशीं बेइमानी केल्यास पित्याच्या संमतीनें पति काय करूं शकेल त्याचें चाबूक हें उत्तम प्रतीक समजले जाई. आजच्या रशियांत ही स्थिति उरलेली नाहीं. रशियातील स्त्री आज स्वतंत्र बनली आहे.

लोकसत्तेचा खरा प्रादुर्भाव पाश्चात्य देशांत सुरू होताच, तेथील स्त्रियांनीं पुरुषांच्या सत्तेतून मोकळें होण्याकरिता स्वातंत्र्याची व स्वायत्ततेची घोषणा सुरू केली. तेथील पुरुषानी ह्या बाबतीत सुरुवातीला त्याना काहीं कमी विरोध केला नाही. पण पुढें स्त्रियाची सरशी होऊन, त्यांना पुष्कळ क्षेत्रात समान-तेचे हक्क मिळाले. पुरुषाच्या खुर्चीला खुर्ची लावून — एके काळीं स्वतंत्र असलेली व पुढें दासी बनलेली – स्त्री पार्लमेंटमध्यें बसूं लागली, बोलूं लागली, विरोध करूं लागली. बौद्धिक व सामाजिक क्षेत्रात स्त्रियांनीं अभूतपूर्व अशी कामगिरी करून दाखविली. योग्य स्वातंत्र्य आणि पुरेशी संधि दिली असताना स्त्रिया काय करूं शकतात ह्याचीं उदाहरणे पाश्चात्य देशांत विपुल आढळतात. कित्येक क्षेत्रात तर स्त्रिया पुरुषांपेक्षा जास्त यशस्वी झालेल्या आहेत. स्त्रियाची ही स्पर्धा लक्षात घेऊन, त्याना मोकळी वाट करून देण्याऐवजीं, तिकडच्या कावेबाज कारखानदारांनीं भलतीकडेच त्यांचें लक्ष वेधून घेण्याचा पद्धतशीर प्रयत्न सुरू केला आहे.

हा प्रयत्न म्हणजे स्त्रियांचें शरीरप्रसाधनेकडे अधिकाधिक लक्ष गुंतवून ठेवणें. पुरुषांना कोणकोणत्या गोष्टी आवडतात, त्यांच्या नजरेत भरण्याकरितां काय काय करावें, शरीर सुंदर व आकर्षक दिसण्याकरिता कोणतीं साधनें वापरावींत इत्यादींच्या मोठ्या व भपकेबाज जाहिराती सतत देण्याचा क्रम ठेवून ह्या लबाड पुरुषांनीं बौद्धिक क्षेत्रांत चढाओढ करणाऱ्या स्त्रियांच्या मनांत व्यामोह उत्पन्न

केला. असें करण्यांत स्त्रियांना पुन्हा एकदा स्वतःच्या नियंत्रणाखाली आणण्याचा पुरुषांचा डाव उघडच दिसतो. परंतु ही गोष्ट तिकडच्या स्त्रियांच्याही लक्षात अजून आल्यासारखी दिसत नाही. पुरुष सांगेल त्याप्रमाणें त्या केश–वेष नि शरीरभूषा करूं लागल्या आहेत. ह्यात त्यांचें स्वातंत्र्य दिसण्याऐवजीं दास्यवृत्तीच दिसते. पुरुष नाचवील त्याप्रमाणे बेलाशक नाचणाऱ्या ह्या स्त्रियांना काय म्हणावें ? दुसऱ्या एका लेखात कचकड्याच्या बाहुल्या म्हणून मी त्याना संबोधिलें आहे. तेच पुन्हा म्हणावेसे वाटते.

ही स्थिति अत्यंत अनुकंपनीय होय. पुरुषाच्या बरोबरीचें स्थान मिळविण्याकरिता वास्तविक स्त्रियानीं झटले पाहिजे. इतर आनुषंगिक गोष्टींचा विचार न करतां पुरुषाला पुरुष म्हणून जशी किंमत आहे, तशी ती स्त्रियांना मिळायला हवी. पण आजतरी ती मिळत नाही. ह्याचें उदाहरण विवाहप्रसंगीं पाहायला सांपडते. सर्व प्रकारच्या कठिण कसोट्या स्त्रियाना लावल्या जातात. वर कसाही असला तरी तो चालतो. परंतु वधू मात्र सर्वगुणसंपन्न असावी अशी अपेक्षा सामान्यपणें असते. अखिल स्त्रीजातीचा हा एक प्रकारें भयंकर असा अपमान आहे. स्त्रीला केवळ ती स्त्री म्हणून ज्या दिवशीं मान दिला जाईल, त्याच दिवशी तिचा खरा उद्धार झाला असें मी समजेन. ही स्थिति प्राप्त करून घ्यायची असल्यास स्त्रियाना बौद्धिक, सामाजिक, राजकीय अशा सर्व क्षेत्रात पुरुषांच्या बरोबरीनें प्रवेश करून घेऊन शक्य तितक्या लवकर आर्थिक स्वातंत्र्य निदान आर्थिक स्वातंत्र्याची लायकी – मिळविले पाहिजे. केवळ आर्थिक स्वातंत्र्याच्या जोरावर पुरुष मन मानेल त्याप्रमाणें वागूं शकतो. स्त्रियांच्या आर्थिक असहायतेमुळें तर त्यांचें चांगलेंच संधान जुळतें. आर्थिक दृष्ट्या, बौद्धिक दृष्ट्या, स्त्रिया एकदा स्वतंत्र झाल्या, की पुरुषाच्या वागणुकीत फरक पडलाच म्हणून समजावें. ह्याचा अर्थ सर्व स्त्रियानीं नोकऱ्या पत्कराव्या, त्याखेरीज गत्यंतर नाहीं, असा करण्याचें मुळींच कारण नाहीं. आर्थिक स्वातंत्र्याकरितां लागणारी लायकी, विद्या आणि औद्योगिक कलांची प्राप्ति त्यांनीं करून ठेवावी. अशा प्रकारची लायकी मिळविलेल्या परंतु नवऱ्याचा संसार करणाऱ्या स्त्रियाचा दर्जा निःसंशय फार मोठा असतो. त्यांनीं केलेल्या स्वार्थत्यागानें त्यांच्या पतींवर एक प्रकारचा त्याचा वचक असतो. बी. ए., एम्. ए. होऊन आर्थिक

स्वातंत्र्याची लायकी मिळविलेल्या, परंतु संसारात व्यत्यय येऊं नये म्हणून नोकरी न करणाऱ्या, किती तरी स्त्रिया मला माहीत आहेत. असल्या स्त्रियाना पुरुष दासी समजूं शकत नाहींत. त्या पुरुषांच्या खऱ्या मैत्रिणी, खऱ्या सल्लागार आणि त्याच्या सुखदुःखाच्या खऱ्याखुऱ्या भागीदार असतात. त्या स्वतःची उन्नति साधतात आणि पुरुषाच्या उन्नतीलाही हातभार लावतात. स्वातंत्र्याच्या, समानतेच्या, परस्परविश्वास आणि परस्परसाहाय्याच्या भूमिकेवर ज्या स्त्रीपुरुषाना आपल्या संसाराची बागशाही थाटता आली ते धन्य होत ! ह्या बागशाहीचें सुख त्यांना तर स्वतःला लुटतां येतेंच, परंतु तिचा सुवास जो सर्वत्र पसरतो त्याचा परिणाम इतरावर कांहीं कमी होतो असें नाही. आणि कोणी झालें तरी आणखी कशाची अपेक्षा करणार ?

# लग्नें शास्त्रज्ञांनीं लावावींत

गोष्ट पुण्यातील आहे. माझे आप्त त्या वेळीं सदाशिव पेठेत राहात असत. सदाशिव पेठ ही सनातनी विचारांची आहे अशा प्रकारची समजूत अलीकडच्या कांहीं लोकानी करून घेतली आहे. माझे आप्त सदाशिव पेठेंत राहात असूनही त्यांचे विचार अगदी अद्यतन असे होते. ह्या माझ्या आप्ताच्या आप्तांपैकीं एका कुटुंबांत एकजात सर्वांचे डोळे बिघडलेले होते. बिघडलेले म्हणजे तात्पुरते आलेले किंवा गेलेले नव्हते; तर कायमचे बिघडलेले. सर्वांचे डोळे जग बघायला फाजील उत्सुक असल्यासारखे बाहेर आलेले, बटबटीत दिसणारे व असून नसल्यासारखे होते. घरात सर्वांच्या डोळ्यावर आपले चष्मे ! आजोबा आजीपासून ते नातू-नातीपर्यंत सर्वच काचेतून बघणारे ! ह्या तडाख्यांतून फक्त घरातील सुना वांचल्या होत्या.

ह्या कुटुंबावर माझ्या नातेवाइकाचा विशेष कटाक्ष होता. विशेषतः एखाद्या मुलाचें किंवा मुलीचे लग्न निघालें म्हणजे हे जागच्या जागीच संतापत. त्याहींतरी भयंकर वाईट गोष्ट होऊन राहिली आहे असे त्याना वाटे. आणि त्यापायीं ते अगदीं बेचैन होत. एकदा मी तेथें असताना असेंच झाले. त्या अधू डोळ्याच्या कुटुंबात एका तरुण मुलाचें लग्न ठरल्यानें आमच्याकडे अक्षत घेऊन ती मंडळी आली. माझे नातेवाईक त्या वेळी कांही न बोलतां अक्षतीचा स्वीकार करते झाले. पण मंडळी गेल्यावर ते एकदम उसळून म्हणाले, " ह्या सर्वांना शूट करायला पाहिजे. "

" शूट करायला पाहिजे ? म्हणजे ? " एकाएकी झालेल्या माऱ्याने गांगरून जाऊन मी म्हणालों.

" शूट म्हणजे एकदम शूट करायला पाहिजे. गोळ्या घालून ठार करायला पाहिजे. अधू डोळ्याच्या मुलाचं हे लग्न करायला निघाले आहेत ! कशाला ? अधू डोळ्यांची संतति निर्माण करायला ? " ते म्हणाले.

" ह्या मुलाला एखादे वेळीं चांगलीही संतति होईल. " मी म्हणालों.

" छट्. तें शक्य नाहीं. गेल्या साठ वर्षांचा ह्या कुटुंबाचा इतिहास मला माहीत आहे. साठ वर्षांत एकाही मुलाचे डोळे चागले निघाले नाहींत. हें आनुवंशिक दिसतं आहे. ह्या मुलाला एखादे वेळीं चागली संतति होईल, अशा भरंवशावर राहाण्यात अर्थ नाहीं. हें कुटुंब समाजाला अपायकारक आहे, राष्ट्राला अपायकारक आहे. त्याचा नाश केला पाहिजे आणि म्हणून मी म्हणतों ह्या सर्वांना शूट केलं पाहिजे. " डोळे लाल करून चढ्या स्वरांत माझे नातेवाईक म्हणाले.

त्याच्या बोलण्याचा भावार्थ माझ्या तावडतोब लक्षात आला व त्याना वाटत असलेली समाजाबद्दलची कळकळ पाहून माझा त्याच्याविषयींचा आदर दुणावला. मी त्याना म्हणालो, " संतति वाईट होते, ह्याच्यावरच आपला कटाक्ष आहे ना ? ह्या कुटुबात एकजात सर्वांचे अधू डोळे असल्यानें त्यानी लग्नं करूं नयेत असं आपणाला वाटतं ना ? "

" अर्थातच. एरवी त्या कुटुंबाशी माझं काहीं वैर नाहीं. "

" मग असं केलं तर ? "

" कसं केलं तर ? " त्यानी उत्सुकतेनें विचारलें.

" ह्यानीं लग्नं करावींत. कारण लग्नावाचून राहाणं अशक्य आहे. परंतु संतति मात्र होऊं देऊं नये. संततिनियमनाचीं साधनं आता उत्तम प्रकारचीं उपलब्ध असल्यानें ह्यांना शूट करण्याची काही जरूरी नाहीं. " मी हसत म्हणालों.

माझा खुलासा ऐकून त्यानाही हसूं आलें व ते म्हणाले, " हें आमच्या वेळी नव्हतं. अशी काहीं व्यवस्था होऊं शकत असेल तर मग आमची हरकत नाही. आमचं म्हणणं इतकंच, कीं ही अधू डोळ्याची प्रजा वाढूं नये. जगात सकस, निरोगी, सुदृढ, सुंदर संतति निर्माण व्हायला हवी. ह्याकरतां शास्त्रज्ञांची मदत घ्यावी लागल्यास ती अवश्य घ्यावी. "

" शास्त्रज्ञाची मदत कशाला घ्यायची ? " मीं विचारलें.

त्यावर ते म्हणाले, " शास्त्रज्ञांच्या सल्ल्यानें वास्तविक लग्नं करायला हवींत. त्यांनीं सर्टिफिकेट दिल्यावर मग मुलामुलींचीं लग्नं करावीत. त्याच्या अगोदर नाहीं. शास्त्रज्ञांनीं सांगितलं कीं अ मुलाचा ब मुलीशीं विवाह लावायला हरकत नाहीं; तरच त्या दोघांचा विवाह लावावा. तशी काहीं सम्मति मिळाल्यावाचून लग्न लावणं हा सामाजिक गुन्हा समजला जावा. "

" म्हणजे विवाहाला तुम्ही एक शास्त्रीय प्रयोग समजतां म्हणायचं ? " मीं उत्सुकतेनें विचारलें.

" कां समजूं नये ? राष्ट्राला गुरें चांगलीं हवी असली तर त्यांच्याकरता प्रयोग केले जातात. आणि माणसं चागली हवीं असली तर मात्र त्याला काही करतां येत नाहीं ! हें आश्चर्य आहे. विवाह ही सामाजिक, राष्ट्रीय गोष्ट आहे. ती करतांना समाजाचा नि राष्ट्राचाच विचार केला जावा. " ते म्हणाले.

" म्हणजे असल्या विवाहांत भावनांना, प्रेमाला कांहींच स्थान नाही म्हणायचं ? " मी अधीरतेनें विचारलें.

" छट्, लग्न हा व्यवहार आहे. व्यवहारांत भावनाकडे लक्ष दिलें म्हणजे आटोपलंच. "

त्यांच्या ह्या बोलण्यावर अधिक वाढवण्यांत काही अर्थ नव्हता. कारण ते तर्कदुष्ट असल्यानें त्यानी आपलें म्हणणे सप्रमाण सिद्ध केले असतें. म्हणून वेळ मारून नेण्याच्या उद्देशानें मी म्हणालो, " आपलं म्हणणं बरोबर आहे. "

माझ्या नातेवाइकाच्या बोलण्यांत बराच विक्षिप्तपणा असला तरी त्यांत सत्य व समाजहित कांठोकांठ भरलेलें होतें. विवाहासारख्या महत्त्वाच्या गोष्टीकडे आपण घाईनें व निष्काळजीपणानें बघतों हें काही चागलें नाहीं. कोणत्याही राष्ट्राला सकस निरोगी, सुदृढ प्रजेची जरूरी असते. हिंदुस्थानला तर ती अधिकच आहे. मिळालेलें स्वातंत्र्य टिकविण्याच्या दृष्टीनें आपल्या राष्ट्रात जोमदार तरुण व तरुणी हव्या आहेत. काळजीपूर्वक, विचारपूर्वक केलेल्या विवाहानेंच ही गोष्ट साध्य होईल. माझ्या आतांनीं सुचविल्याप्रमाणें शास्त्रज्ञांकडून सर्टिफिकेट मिळवतां आलें तर उत्तमच. परंतु लग्नासारख्या गोष्टींत मनोभावनांनाही विशिष्ट स्थान असल्यानें असलीं सर्टिफिकेटें कोणी मिळवायला

तयार होईल असें थोडेंच खात्रीपूर्वक सांगता येईल? त्यातून मध्यम मार्ग असा सुचविता येण्याजोगा आहे, की स्त्रीपुरुषानी एकमेकाची वधूवर ह्या नात्याने पसंदगी करताना मनांतल्या मनांत राष्ट्राला हवी असलेली सुदृढ प्रजा आपण देऊं शकूं कीं नाही ह्याचा संपूर्ण विचार करावा. आपल्या देशांत अजूनही मोठ्या प्रमाणावर आईबापाच्या मध्यस्थीनें वा पसंतीनेंच लग्नें होतात. तेव्हां मातापितरांनीं ह्या गोष्टीकडे जरा तटस्थपणें अधिक लक्ष पुरवायला हरकत नाही. किंबहुना असे करणें त्याचें आद्यकर्तव्य आहे. लग्न ठरवितांना हुंडा, करणी, मानपान, सांपत्तिक स्थिति, सामाजिक प्रतिष्ठा ह्याचा जास्त विचार करण्यात येतो, तसाच सुदृढ संततिक्षमतेचा विचार केला जावा. इतकेंच नाही तर हा विचार आद्य महत्त्वाचा समजावा.

अशक्त, कुरूप, रोगी, खुजे, वेडे इत्यादिकांनीं लग्नें करावीत किंवा नाहीं ह्याचें उत्तर देणें कठिण नाहीं. अशांनीं लग्नें करूं नयेत, हेंच त्याला उत्तर आहे. ह्या मंडळींना लग्नें करायचींच असलीं तर त्यानी शस्त्रक्रिया करवून आपणाला संतति होणार नाहीं, ह्याची खात्री करून घ्यावी व त्यासंबंधीचें सर्टिफिकेट आपल्याजवळ ठेवावें. असें सर्टिफिकेट असल्यावर मग कोणी मुलगी किंवा मुलगा द्यायला तयार असेल तर तिच्याशी किंवा त्याच्याशी खुशाल लग्न करावें. असें जर ते न करतील तर ते राष्ट्राशी प्रतारणा करीत आहेत असें ठरेल. इतकेंच नाहीं तर वर सांगितल्याप्रमाणें त्यांचा एखादा आप्त मनातल्या मनांत त्याना शूट करण्याचीही भाषा बोलत राहील.

# नालंदा - तक्षशिला

आपलें अज्ञान किती तीव्र किंवा भयंकर स्वरूपाचें असतें ह्याचें परवां मला प्रत्यंतर आले. प्राचीन भारताच्या सरस्वतीचीं केंद्रस्थानें म्हणून तक्षशिला व नालंदा ही प्रसिद्ध आहेत. हीं नावें इतक्या वेळा उच्चारलीं जातात, कीं तक्षशिला म्हटले म्हणजे नालंदाचें नांव आठवतें आणि नालंदा नाव उच्चारलें कीं तक्षशिला ह्या नावानें पाठलाग केलाच म्हणून समजावें. स्मृतीच्या प्रांतात सख्ख्या बहिणींप्रमाणें नांदणारी हीं नावें व्यवहारांतही जवळ जवळ असावीत असें मला नेहमीं वाटत असे. ऑक्सफर्ड म्हटलें कीं केंब्रिजचे नांव चटकन् डोळ्यासमोर येतें. आणि ह्या दोन्ही विद्यापीठात फारसें अंतरही नाहीं. नालंदा-तक्षशिला ह्या विद्यापीठाच्या बाबतींत माझी अशीच समजूत होती, कीं ती ऑक्सफर्ड केंब्रिजप्रमाणेंच जवळ जवळ असतील. आणि ह्या समजुतीनें मी इतका पछाडलों गेलों होतो, कीं माहितीचा आविर्भाव आणीत मीं परवां एका प्राच्यसंशोधकाला सवाल टाकला —

" नालंदा तक्षशिलेपासून कितीसं दूर आहे ? "

" दूर ! "

" होय, दूर ? " मी म्हणालों.

ह्यावर तो संशोधक हसला आणि म्हणाला, " मुंबई आणि बडोद्यांत जेवढं अंतर आहे त्याहूनही अधिक अंतर नालंदा आणि तक्षशिला ह्यांत आहे. एक आहे पेशावरच्या जवळ तर दुसरं आहे पाटणाच्या कितीतरी पलीकडे. "

ह्यावर मीही हसलों आणि म्हणालों, " अस्सं काय ? मी समजत होतों, असेल बडोदा-अहमदाबाद इतकं अंतर. माझ्या अज्ञानाबद्दल मला माफ करा. "

नालंदा-तक्षशिला ह्या जोडीप्रमाणें आपल्या मनांत शब्दांच्या नि कल्पनांच्या जोड्या हातांत हात घालून वावरत असतात. एका कल्पनेचें नांव घेतलें कीं दुसरी आलीच मागोमाग. स्मृतिक्षेत्रांत वावरणाऱ्या वस्तूंना मला

बालकांची उपमा द्यावीशी वाटते. "हा घर खाऊ," असें म्हणून आपण एखाद्या मुलाला हाक मारली म्हणजे, आणि "मला, मला नाहीं का?"— असें म्हणत मुलाचा घोळका जसा जमा होतो, तसाच विचारांचा व कल्पनांचा वा शब्दांचा घोळका, आपण स्मृतीच्या अंगणांत खेळत असलेल्या एखाद्या शब्दाला पाचारिलें असतांना जमा होतो. ओटीवर कोण आलें आहे हें पाहाण्याची ज्याप्रमाणें घरांतील मुलांना उत्सुकता असते, त्याप्रमाणें अंतर्मनांत राहाणाऱ्या कल्पनांना नि विचारानाही बहिर्मनांत कोणाला पाचारण्यात आले आहे हें जाणण्याची भारी इच्छा असते. माझ्या मनांत तक्षशिला हें नांव येऊन तोंडावाटे मी त्याचा उच्चार करणार, तोंच नालंदा हेंही जिव्हाग्री येऊन उभें असतें तें ह्याचमुळें होय.

हीच तऱ्हा सुख-दुःख, उन्नति-अवनति, स्वर्ग-नरक, दिवस-रात्र, जन्म-मृत्यु ह्या शब्दसंघाची. आज हजारों वर्षे झालीं, ह्या गोष्टीचा आपण इतका विचार केला आहे आणि करीत आहोंत, कीं त्यांना आपण वेगळे पाहूं शकत नाही. पतिपत्नींत एक वेळ लग्नविच्छेद संभवेल; पण सुख-दुःखांत, स्वर्ग-नरकात, उन्नति-अवनतींत विभक्तपणा संभवणे शक्य नाहीं! सुख म्हटले की त्याच्यामागून दुःख आलेंच! उन्नति म्हटली की तिच्यामागून अवनति आलीच! का? तर दिवस म्हटला की मागाहून रात्र येते! जन्म म्हटला कीं मागाहून मृत्यु येतो! सुख-दुःखाचें, उन्नति-अवनतीचें, दिवस-रात्रीचें, जन्म-मृत्यूचें एक अजस्र रहाटगाडगे आहे असें समजण्यांत येतें! तें त्याला जुंपलेल्या बैलाइतकेंच बुद्धियुक्त नि डोळस असतें! विश्वाच्या ह्या अजब चक्राला एकच तमाशा दाखविणें माहीत. सारखे फिरत राहाणे! एखाद्या योग्य ठिकाणीं थांबणें हें तें हराम समजतें. हौद तुमचा भरो, वाहून जावो, त्याला त्याची पर्वा नाहीं. त्याला एकच कर्तव्य माहीत. सतत फिरत राहाणें. सुख असेल तेथें दुःख निर्माण करणें, उन्नति असेल तेथें अवनति तयार करणें, जन्म असेल तेथें मृत्यु आणणें, दिवस असेल तेथें रात्र करणें!

बिचारें चक्र! वेड्यासारखें फिरत सुटणाऱ्या ह्या चक्रावरून 'चक्रम' शब्द निघाला असावा असें मला पुष्कळ वेळा वाटतें.

नालंदा - तक्षशिला

पण माझी खात्री झाली आहे कीं ह्या सर्व विचारांत नालंदा-तक्षशिलेचाच प्रकार मला तरी आढळतो. ही रहाटगाडग्याची कल्पना आपण जितक्या लवकर सोडून देऊं तितके अधिक कार्यक्षम बनूं. वास्तविक पाहिलें असतांना, नालंदा आणि तक्षशिला ह्यांत जेवढा संबंध आहे किंवा नाही, तितकाच संबंध सुख-दुःखातही आहे किवा नाहीं. सुखामागून दुःखाने यावे आणि दुःखामागून सुखानें यावें; एक पहारेकरी पहारा करून गेला की दुसरा त्याच्या जागीं येतो. जीविताच्या चौकीवर सुखदुःखाचे पहारेकरी बसविले आहेत असें समजण्याचें कांहींच कारण नाहीं. जीवित हे स्वतःच इतकें खंबीर आहे कीं त्याच्याभोवती चौकीपहाऱ्याची काही जरूरी भासूं नये. व्यक्तीला काय आणि देशाला काय, योग्य प्रकारची खबरदारी व अवधानता बाळगल्यास, सुखामागून दुःखानुभव किंवा उन्नतीच्यामागून अवनतीचा अनुभव घ्यायलाच पाहिजे अशा प्रकारचा दंडक कोणीही घालून दिलेला नाही. असलाच दंडक तर तो मानसिक आहे, काल्पनिक आहे, भ्रामक आहे. नालंदा-तक्षशिलेचा तो अजागळपणा आहे.

आपल्या लोकाना तर्क किंवा कुतर्क करण्याचे सामर्थ्य फार आहे. एका पुरुष आणि एक स्त्री जर जवळ जवळ आलीं किंवा बोललीं किंवा चालले तर लागलीच आम्ही तर्क करतों, ही अलबेली ह्या गुलछबूचीच होय ! रस्त्यानें चालत असतांना, सभास्थानी किंवा नाटकगृहांत बसलों असताना, कित्येक अशा घटना निर्माण होतात. आपल्या शेजारीं एखादी बाई किंवा बुवा, तरुण किंवा तरुणी, ही बसलेली असतात. पण म्हणून काय आपला त्यांचा कांहीं संबंध थोडाच असतो ? तीच तऱ्हा सुखाच्याजवळ बसलेल्या दुःख ह्या शब्दाची. उन्नतीच्या माडीला मांडी लावून बसलेल्या अवनतीची. स्वर्गाच्या हाताला हात लावून बसलेल्या नरकाची.

आणि ह्याची उदाहरणें काहीं थोडीथोडकीं नाहींत. सुखानंतर दुःखानुभव जर क्रमप्राप्त, तर असे किती तरी लोक आहेत, की ज्यांना हा प्रकार मुळीच माहीत नाहीं. माझ्या माहितींत असे कांहीं भाग्यवान लोक आहेत. राष्ट्राची गोष्ट घेतली तरी हेंच आढळेल. इंग्लंड किंवा अमेरिका हीं राष्ट्रें घ्या. गेल्या

पंचवीस वर्षांनंतर

कित्येक शतकांत त्यांचें काय वावगें झालें आहे ? चक्रनेमिक्रम असेल, तर तो ह्याही राष्ट्रांना लागू असला पाहिजे. का रहाटगाडग्याच्या कल्पनेंतून दानवांचीं हीं राष्ट्रं वजा करण्यांत आलीं आहेत! राष्ट्रधुरीण आणि राष्ट्रांतील प्रजा ही कर्तबगार असल्यावर राष्ट्रानें उन्नतीच्याच मार्गानें वरवर जावें असा निसर्गाचाच नाहीं तर व्यवहाराचाही नियम आहे.

फुलाला फळ यावें त्याप्रमाणें सुखानंतर दुःखानें यावें किंवा दुःखानंतर सुखानें यावें असा कांहीं सृष्टीचा नियम नाहीं. सुख-दुःख काय किंवा उन्नति-अवनति काय, आपणच त्यांचे निर्माते. त्यांच्यांत परस्परसंबंध कांहीं नाहीं. असलाच तर तो ज्ञान-अज्ञानासारखा किंवा नालंदा-तक्षशिलेसारखाच फार दूरचा होय.

# मनधरणी

"जळूला मेला आमचा बायकांचा जन्म!" माझी एक सुविद्य मैत्रीण अगदीं हताशपणें म्हणाली.

"बायकांच्या जन्माविषयीं इतके अनुदारपणाचे उद्गार काढण्याजोगं झालं तरी काय?" मीं विचारलें, "तुमचा तर संसार सुखानें चाललेला मी पाहातों आहें."

"मी माझ्याविषयीं नाहीं म्हणत. सामान्यपणें स्त्रियांच्या विषयीं म्हणतें. लहानपणीं त्यांना वडिलांची किंवा भावांची मनधरणी करावी लागते. तरुणपणीं सासूसासऱ्यांची, जावानणंदांची, दीरांची नि नवऱ्याची मनधरणी करावी लागते. आणि म्हातारपणीं मुलांची मनधरणी करावी लागते. छे! छे! स्त्रियांचा जन्म अगदीं व्यर्थ. आपल्या मनाजोगतं त्यांना कांहींच करतां येत नाहीं. मन मोकळं करून वागण्याऐवजीं त्यांना आपलं मन मारून जगांत वागावं लागतं; साऱ्या जगाची मनधरणी स्त्रियांना करावी लागते."

"तुम्ही म्हणतां त्यांत बरेंच तथ्य आहे. स्त्रियांना क्रूरपणानें वागविणाऱ्या पुरुषांकडे पाहिलं असतांना मनांत संताप उत्पन्न होतो. पण सर्वच स्त्रियांना कांहीं मनधरणी करावी लागत नाहीं. माझ्या समजुतीप्रमाणें तुम्हांला कांहीं फारशी मनधरणी करावी लागत नसावी."

"माझं एक सोडा. इतर स्त्रियांचं मी म्हणतें." माझी मैत्रीण म्हणाली.

"तुमचा उल्लेख मी सहेतुकपणें करतों आहें. मला कांहीं मुद्दा मांडायचा आहे. ज्या स्त्रिया आर्थिक दृष्ट्या स्वतःच्या पायावर केव्हांही उभ्या राहायला समर्थ असतात त्यांना कोणाची फारशी मनधरणी करावी लागत नाहीं. तुमच्या ठिकाणीं अशा प्रकारचं सामर्थ्य आहे. ज्या मानानें स्त्रियांचं अशा प्रकारचं आर्थिक सामर्थ्य वाढेल त्या मानानें त्यांना आपलं मन मोकळं करून जगांत वावरतां येईल, त्यांना कोणाची मनधरणी करावी लागणार नाहीं. माझ्या घरीं

जी मोलकरीण येते ती आपल्या नवऱ्याची मनधरणी करतांना आढळत नाहीं. उलट तिच्या नवऱ्यालाच तिची मनधरणी करावी लागते. " मी हसत म्हणालों.

" असलीं उदाहरणं फार थोडीं. परवांच्याच दिवशींची गोष्ट. आमच्याकडे काम करायला येणाऱ्या मोलकरणीला तिचा सासरा रस्त्यावरून फरफरा ओढीत नेत होता! तिचा नवरा तिला मारीत होता. तिची सासू तिला मारीत होती. तिचा गुन्हा काय तर ती आपल्या आईला भेटायला चालली होती. मन मारून ज्या घरांत एखाद्या स्त्रीला राहावं लागतं तिच्याइतकी दुर्दैवी व्यक्ति दुसरी कोणी नसेल. आमच्या मोलकरणीला ती स्वतः कमावीत असूनही मनधरणी करावी लागते त्याचं काय ? "

" त्याचं कारण उघड आहे. स्वतःच्या पायांवर उभं राहातां येईल इतकं कांहीं ती कमावीत नाहीं. इतकं जर ती कमावीत असेल तर तिला कोणाचीच पर्वा वाटण्याचं कारण नाहीं. दुसरंही एक कारण आहे. तुमची मोलकरीण शिकलेली नाहीं. तिच्या ठिकाणीं आपल्या हक्काची जाणीव झालेली नाहीं. "

" हें बरीक खरं. सासूसासऱ्यांनीं मारलं तर फारसं कांहीं वाईट झालं असं तिला वाटलं नाहीं! दुसऱ्या दिवशीं एखाद्या सामान्य घटनेप्रमाणें तिनें मला सर्व हकीगत सांगितली. मी असतें तर माझ्या अंगाला हात लावणाऱ्या सासऱ्याला चावलें असतें आणि सासूच्या झिंज्या ओढल्या असत्या. " माझी मैत्रीण हसत म्हणाली.

" फार चांगलं केलं असतंत " मीही उलट हसत म्हणाली, " पण तुम्ही समजतां तितकी मनधरणी कांहीं वाईट नाहीं आणि तिच्यांतून कोणी फारसा सुटूंही शकत नाहीं. मी पुरुष असूनही मला मनधरणी करावी लागतें. "

" आश्चर्य आहे! पुरुषांना मनधरणी कशाला करायला हवी ? "

" पुरुषांना देखील मनधरणी करावीच लागते. मीं ज्या ठिकाणीं काम करतों तिथल्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या कलाकडे पाहून मला आपलं काम करावं लागतं. त्याला कोणती गोष्ट आवडते, कोणती आवडत नाहीं इकडे मला लक्ष पुरवावं लागतं. वर्गातील मुलांचीही एकप्रकारें मनधरणी करावी लागते. त्यांना

आवडेल, पचेल, परीक्षेच्या दृष्टीनें उपयोगीं पडेल अशा पद्धतीनें शिकवावं लागतं. विद्यार्थ्यांच्या विविध आवडीनिवडी असतात. त्या सर्व लक्षांत घेऊन बोलावं लागतं. विद्यार्थीप्रिय प्राध्यापक ह्याचा अर्थ विद्यार्थ्यांची एक प्रकारें मनधरणी करणारा प्राध्यापक असा मी तरी करतों. विद्यार्थ्यांच्या गरजा लक्षांत न घेतां बोलणारा प्राध्यापक हा जरी प्रत्यक्ष बृहस्पति असला तरी त्याची रेवडी उडविल्याखेरीज विद्यार्थी राहाणार नाहींत. जी गोष्ट प्राध्यापकाची तीच इतर सर्व शिक्षकांची, कारकुनांची, अधिकाऱ्यांची आणि कामगारांची. तुम्ही व्यापाऱ्यांना स्वतंत्र समजत असाल, पण त्यांना देखील मनधरणी करावीच लागते. एकीकडे सरकारी अधिकारी नि दुसरीकडे गिऱ्हाईक अशा दोघांची त्यांना मनधरणी करावी लागते. मनधरणी ज्याला करावी लागत नाहीं असा मनुष्य माझ्या पाहाण्यांत नाहीं. अगदीं मुमुक्षु घेतला तर त्याला खुद्द आपल्या मनाचीच मनधरणी करावी लागते. मला स्वतःला तर पदोपदीं मनधरणी करावी लागते. घरांतल्या लहान मुलांची, बायकोची, आईची, स्नेहीसोबत्यांची सर्वांची मनधरणी करावी लागते."

"तुम्हीं तर माझ्या बोलण्याची थट्टाच आरंभलेली दिसते."

"नाहीं हो. तुमच्या बोलण्याची थट्टा मी कसा करीन? तुम्ही म्हणालांत तें सर्व खरं आहे. वाईट प्रकारची मनधरणी कोणींही करूं नये. स्वाभिमानाला सोडून मनधरणी कधींच करूं नये. स्त्रियाना पुरुषांपेक्षां थोडीफार जास्त नि थोड्या कमी प्रतीची मनधरणी करावी लागते ह्यांत शंका नाहीं. परंतु वाढत्या स्त्रीशिक्षणाबरोबर स्त्रियांचं आर्थिक स्वातंत्र्यही वाढेल. आणि असं झालं म्हणजे मग त्यांना सक्तीची मनधरणी करावी न लागतां खुषीची मनधरणी करता येईल."

माझें बोलणें माझ्या मैत्रिणीला पटलेलें दिसलें. कारण त्यानंतर तिनें वाद घालीत न बसतां स्वतःच्या हातांनीं चहा तयार केला व तो माझ्यापुढें ठेवीत ती हसत म्हणाली, "ह्याला देखील तुम्ही मनधरणी म्हणाल?"

ह्यावर मीही उलट हसत म्हणालों, "अलबत."

आणि तें खरेंच नाहीं का? सक्तीनें करावी लागणारी मनधरणी ही निःसंशय वाईट असली तरी इतर प्रकारची मनधरणी ही कांहीं वाईट नसते. इतकेंच नाहीं तर ती चांगली असते व आवश्यकही असते. जगांत फिरत असतांना आपणाला हरघडी इतरांच्या मनांचा कल पाहून वागावें लागतें. मग आपण स्वतःच स्वखुषीनें तसें वागलें तर काय वाईट? दुसऱ्याच्या मनाजोगतें वर्तन आपण स्वखुषीनें, आनंदानें केलें तर त्यांत कोठें बिघडलें? त्याला उलट आपण आपल्या अंकित करून ठेवतों. स्त्रियांना मनधरणी कोठें कोठें सक्तीनें करावी लागत असेल. ती अर्थातच आत्माविष्काराच्या आड येणारी असल्यानें वाईट होय. परंतु एरवीं स्त्रिया जी मनधरणी करतात, त्यानें त्या साऱ्या जगाला आपला दास बनवीत नाहींत का? स्त्रियांच्या एकाच मन-धरणीच्या शब्दांत केवढें मोठें सामर्थ्य असतें हें स्त्रियांना नाहीं कळलें तरी पुरुषांना खास कळतें आणि मला तर वाटतें तें स्त्रियांना देखील उत्तम प्रकारें कळतें. स्त्रियांची मनधरणी म्हणजे पुरुषांच्या स्वातंत्र्याचें आणि बाणेदारपणाचें मरण होय. स्त्रीनें केलेल्या हुकुमाची पुरुष एकादे वेळीं पायमल्ली करील. परंतु त्याची सेवा करीत (किंवा सेवा करीत असल्याचा बहाणा करीत) जेव्हां ती त्याची मनधरणी करूं लागते, त्या वेळीं तो तिच्याकरितां काय वाटेल तें करायला तयार असतो. माझ्या मैत्रिणीचें मनधरणीविषयीं कांहींही मत असो, माझी तर अशी बालंबाल खात्री आहे, की जेव्हां एकादी स्त्री एकाद्या पुरुषाची मनधरणी (अर्थात् स्वखुषीची) करते त्या वेळीं त्याच्याइतका असहाय प्राणी दुसरा कोणी नसेल!

# मला चीड येते

सामान्यपणें लहान सहान दोषांची, चुकांची चीड मला येत नाहीं. तसेंच मोठें कारण असल्यावांचून मला राग देखील येत नाहीं. रागावणें ह्याचा अर्थ समोरच्याचा विचार सहानुभूतीनें न करणें होय, असें प्रायः म्हणायला हरकत नाहीं. ह्याच्या उलट सबळ कारण असूनही न रागावणें हें मनुष्यत्वाचें लक्षण नाहीं असेंच मी मानतों. वेळेवर रागावलें पाहिजे हें जसें खरें, तसेंच सहसा रागावूं नये, हेंही खरेंच. हें सर्व कळत असूनही कांहीं कांहीं गोष्टी पाहून माझ्या जिवाचा अगदीं संताप होतो. मला मनस्वी चीड येते.

आमच्या गुजरात प्रांतांत आमचे जे गुर्जर बंधु व ज्या गुर्जर भगिनी आहेत, त्यांची दांतवण करण्याची जी पद्धति आहे ती अत्यंत घाणेरडी आहे. दांतवणाकरितां बाभळीच्या काड्या ते वापरतात त्या चांगल्या असतात. अर्धा अर्धा तास ह्या काड्या ते चावीत बसतात तीही कांहीं वाईट गोष्ट नाहीं. परंतु ही सर्व क्रिया ते घराबाहेर ओट्यावर बसून करतात, ही चीड आणणारी गोष्ट आहे असें मला तरी वाटतें. तोंड स्वच्छ करतांना त्यांच्या तोंडाला वेडावांकडा आकार येतो तो तर मला पाहावत देखील नाहीं. आपल्या गळ्यांतील, दांतांतील, तोंडांतील सर्व घाण रस्त्यावर टाकून इतर नागरिकांच्या आरोग्याला ते जी हानि पोंचवितात ती मला अगदीं भयंकर वाटते. स्वतः गुजराती समाजांतील विचारवंतांचें इकडे लक्ष वेधेल तर त्यांना चटकन् ही गोष्ट गैर आहे असें कळून येईल. वाईट रूढि दुराग्रहानें चालू न ठेवतां आपल्या आपणच मोडल्या पाहिजेत. सकाळच्या प्रहरीं रस्त्यांतून आपण जात असतांना, रस्त्याच्या दुतर्फा लोक अशी घाण करीत असलेले आपणाला आमच्या गुजरातेंत बहुतेक सर्व ठिकाणीं आढळतील. मोरींत बसून तोंड धुणें ह्यांना माहितच नाहीं. सुंदर सुंदर स्त्रियांना अशा पद्धतीनें दांत साफ करीत असतांना मीं पाहिल्या कीं मला ओकारीच येते. रस्ता घाणेरडा करणारी व अदर्शनीय अवस्थेंत स्वतःला दुसऱ्यांना दाखविणारी ही दांतवणाची तऱ्हा पाहिली कीं मला अगदीं चीड येते. ह्या बाबतींत कांहीं समंजस गुजराती

बंधूंशीं माझें बोलणें झालें असतांना, त्यांनाही ही गोष्ट वाईटच आहे असें वाटतें असें मला कळलें. त्यांच्यापैकीं एका लेखकानें ह्या तऱ्हेच्या विरुद्ध लिहिलेंहि आहे. तुम्ही देखील लिहा, असें त्याने सांगितल्यावरून ह्या लहानशा दोषाचा मी मुद्दामच उल्लेख करीत आहें.

कांहीं कांहीं लोकांना ते चारचौघांत बसले असतांना आपल्या नाकांत बोटें घालण्याची भयंकर (म्हणजे अक्षरशः भयंकर) संवय असते. अशी किळसवाणी क्रिया ज्या वेळीं हे लोक करतात त्या वेळीं मला त्यांच्याकडे मुळीं पाहावतच नाहीं. माझी सौंदर्याची जी कल्पना आहे तिला कोणी चराचरा कांपतें आहे असेंच मला वाटतें. ह्या लोकांना आपलें नाक न्हाणीघरांत जाऊन स्वच्छ नाहीं का करतां येणार? पण ते तसें करणार नाहीत. चार लोकांत बसले असतांना आपल्या नाकपुड्यांत बोटें घालून, त्यांतील घाण ते वाटेल तिथें टाकतील! असले लोक पाहिले कीं मला फारच चीड येते. त्यांच्याशीं जुळत असलेला संबंध मी तोडून टाकतों. शी, शी! असल्या घाणेरड्या लोकांशीं संबंध मला कधींच ठेवायला आवडणार नाहीं. पुष्कळ मोठ्या लोकांनाही ही वाईट संवय जडलेली मीं पाहिली आहे. प्रोफेसर, वकील, डॉक्टर, इंजिनिअर असे बहुतेक सर्व पेशांतील स्त्री-पुरुष ह्या गलिच्छ संवयीला बळी पडलेले आढळतात. असें मी पाहिलें आहे कीं ही मंडळी अगदी नादांत आली, कीं त्यांच्या नकळत त्यांचीं बोटें त्यांच्या नासिकाप्रांतांत शिरून, दुसऱ्यांच्या दृष्टीनें त्यांना कुरूप बनवितात. मनुष्याच्या सर्व शरीरांत त्याचें नाक म्हणजे अगदीं मर्मस्थान असतें. "जेविं नासिकेवांचुनि वदन" असें एका कवीनें म्हटलेंच आहे. मनुष्याचें तीन चतुर्थांश सौंदर्य त्याच्या नाकावर अवलंबून असतें. असें असतांना आपल्या नाकाला विद्रूप बनविणाऱ्या ह्या संवयीला ते कां सोडीत नाहींत ह्याचें मला आश्चर्य वाटतें. नाकाप्रमाणेंच दांत कोरण्याची, तोंडांत बोटें घालण्याची वाईट संवय कांहीं लोकांना असते. अर्थात् ह्या प्रकारानें देखील मनुष्य विरूप दिसतो. आरोग्याच्या दृष्टीनें देखील बोटें न धुतां तोंडांत घालणें अत्यंत अहितकारक असतें. पण कांही लोक इतके साधे म्हणजे बावळट किंवा घाणेरडे असतात कीं, चार लोकांत ते बसले असले तरी तोंडांत बोटें (अलंकारिक अर्थानें नव्हे) घालतील!

ह्या मंडळींना देखील न्हाणीघरांत जाऊन आपलें तोंड स्वच्छ करून यायला काय होतें कोणास ठाऊक! असल्या लोकाना पाहिलें कीं मला अगदीं चीड येते.

काहीं लोकांना खूप मोठ्याने बोलण्याची संवय असते. श्रोते दोन असोत कीं दोनशे असोत, हे आपले गळ्याच्या शिरा फुगवून मोठमोठ्यानें बोलत असतात. ह्याच्या बोलण्यात नसतें मार्दव का नसतो चढउतार. अगदीं बेंबीच्या देठापासून कोणत्याही विषयावर हे बोलत असतात. बोलणें म्हणजे ओरडणें, असाच जणूं काय ते अर्थ करीत असावेत. अशा लोकांशीं बोलण्यांत काय मजा वाटणार? एकाद्या व्याख्यात्याप्रमाणे ते तुमच्याशीं कोणत्याही क्षुद्र मुद्द्यावर बोलायला तत्पर असतात. दुसरी मौज अशी, कीं हे दुसऱ्याचें ऐकून घ्यायलाही तयार नसतात. देवानें ह्याना फक्त तोंडच दिलें असावें. कान दिलेच असल्यास निदान ते फार लांब तरी असावेत. एरवीं इतक्या मोठ्यानें ओरडण्याची उपपत्ति लागणें शक्य नाही. माझ्या परिचयाचे दोन तीन गृहस्थ असे आहेत. अर्थात् त्याना चुकविण्याचा प्रयत्न मी सतत करीत असतों. त्यांना दुरून पाहातांच "पळा पळा रे पळा पळा" असें मी माझ्या पायाना सागतों. तरीपण एकादे वेळी त्याच्या तडाख्यात मी सांपडतोंच. माझ्या कुंडलींतील ती घातवेळ असल्याचें मागाहून मला कळतें. इंग्रज स्त्रीपुरुषांच्या मानानें सामान्यपणें आपण सर्वच मोठ्यानें बोलतों. मागें आमच्या घरीं कांहीं कार्यानिमित्तानें एक इंग्रज गृहस्थ आला होता. त्याला बसाउठायला मी घरची जागा दिली होती. त्याने आल्यापासून चार दोन तासातच मला असें विचारलें, "तुझ्या घरांतलीं सर्व माणसें ओरडत कां होतीं?" तीं ओरडत नसून प्रेमालाप करीत होतीं, असें मीं त्याला सांगितलें. परंतु त्याचा कांहीं विश्वास बसेना. त्याला वाटलें सर्व मंडळी भांडताहेत. पुढें दोन दिवस सतत त्याला हाच अनुभव आल्यानें त्याची खात्री पटली. परंतु मनातल्या मनांत तो आश्चर्य करीत राहिला होता ह्यांत शंका नाहीं. हें झालें सामान्य माणसाचें. त्या माझ्या इंग्रज मित्रानें आपल्यांतील मोठ्यानें बोलणारे लोक ऐकले असते, म्हणजे तो अगदी बेशुद्धच पडला असता असें मला वाटतें. छे, छे! मोठ्यानें बोलण्याची ही तऱ्हा देखील निःसंशय चीड

उत्पन्न करणारी आहे. बोलणें म्हणजे कसें मृदु, मोहक, मंजुळ, मनोज्ञ किंवा मस्त असावें. बोलणें म्हणजे ओरडणें कधींच नसावें.

विद्यार्थीवर्गात अलीकडे अकारण हसण्याची तऱ्हा बोकाळली आहे. विशेषतः विद्यार्थिनींत तर हा आचरटपणा प्रकर्षानें पाहायला सापडतो. आपण खिलाडू वृत्तीचे आहोंत असें दाखविण्याचा हा एक हास्यास्पद प्रकार आहे असें मला वाटतें. अलीकडचे विद्यार्थी किंवा विद्यार्थिनी कोठेंही असोत व कांहींही करीत असोत, एकीकडे त्याचें हसणें चालूच असतें. त्या हसण्याला कांहीं निमित्त नसतें किंवा त्यात काही मोहकपणा नसतो. कांही रडव्या लोकांचें रडण्याकरितांच जसें रडणें असतें तसें ह्यांचें हसणें हसण्याकरिताच असतें. माणसानें आनंदी व उत्साही असलेंच पाहिजे व नसलें तर बनलेंच पाहिजे, हें मी नेहमीं सांगत आलों आहें. परंतु त्याचा अर्थ अकारण व आचरटपणानें हसत राहाणें हा खचित नाहीं. हसणें असें असावें कीं त्यानें पाहाणाऱ्याचें मन मोहिलें जावें, त्याला आनंद वाटावा, त्याला प्रेरणा मिळावी. असल्या मूर्खपणाऱ्या हसण्याचें इतराना काय वाटतें तें मला माहीत नाहीं. मला मात्र असें कोणी हसलें तर त्याची खरोखरच चीड येते. दर वर्षी कॉलेजांत जीं नवीं मुलें, नव्या मुली येतात, त्यांना ह्या बाबतींत चार खरमरीत शब्द सांगण्याची पाळी माझ्यावर येते. वर्गात बसून अकारण हसणें हें मला कधींच सहन होत नाहीं. हास्योत्पादक प्रसंग असूनही जर त्यावेळीं कोणी हसले नाही तर आपल्या शिकविण्यांत कांहींतरी वैगुण्य आहे असें जसें मला वाटेल, तसेंच तसें कांही कारण नसतांना जर कोणी हसलें तर तेंही मला अपमानकारकच वाटेल. वर्गात बसल्यावर वर्गाची शिस्त पाळलीच पाहिजे, ह्यावर माझा कटाक्ष आहे. शिक्षकानें जसा आपला विषय सरळ व मनोरंजक रीतीनें शिकविला पाहिजे, तसेंच विद्यार्थ्यांनीं देखील वर्गात शांतपणें बसूनच तो ऐकला, शिकला पाहिजे. शिक्षक कांहीं तरी गबाळेपणानें सांगत आहे व विद्यार्थी त्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून हसत आहेत, हा प्रकार केवळ लज्जास्पद होय. त्यांतही विषेश म्हणजे विद्यार्थ्यांनींच वर्गात आदर्श वागणूक ठेवून शिक्षकाकडून जितकें ज्ञान, जितकी माहिती मिळवितां येईल, तितकी अगदीं अधाशाप्रमाणें मिळविली पाहिजे. उत्तम वक्ता हा उत्तम श्रोतेच तयार करूं शकतो, श्रोत्यांवांचून वक्ता तयार होणेंच

शक्य नाहीं, अशा अर्थाचें ज्ञानेश्वरांनीं जें एके ठिकाणीं म्हटलें आहे तें निःसंशय खरेंच आहे. पण हें ह्या आचरटपणें हसणाऱ्यांना कोठून कळणार ?

हीं झाली सौंदर्याला किंवा आरोग्याला विघातक अशा गोष्टींमुळें येणाऱ्या चिडींचीं उदाहरणें. राष्ट्राचें किंवा व्यक्तीचें नैतिक सौंदर्य किंवा आरोग्य बिघडविणाऱ्या गोष्टी पाहिल्या म्हणजे देखील मला अगदी मनस्वी चीड येते. दांभिक आणि दिखाऊ लोकाना पाहिलें की माझ्या तळव्याची आग मस्तकाला जाते. जगांत अत्यंत घातक असे जर कोणी असतील तर हे दांभिक, दिखाऊ लोक. ह्यांच्या मनांत एक असतांना बाहेर ते दुसरेंच दाखवितील. बाहेरून हे हसतमुख दिसतील, तोंडावर ते "हो हो, बरोबर आहे" असें म्हणतील. राजनिष्ठा, देशनिष्ठा, सत्यनिष्ठा ह्यांच्या गप्पा ते मारतील. परंतु आतून ते राजाच्या, देशाच्या, सत्याच्या खुनाची तयारी करीत असतील. माणुसकी, सत्य, दया, नीति ह्यांना ते सर्वस्वीं पारखे झालेले असतात. ज्याची सरशी असेल त्याच्याकडे केवळ स्वतःच्या स्वार्थाकरितां आणि दुसऱ्यांना दुःख देतां यावें म्हणून हे जातील. देशाचे व मानव जातीचे हे नंबर एकचे शत्रु समजले पाहिजेत. समाजाच्या सर्व थरांत हे लोक आहेत. शिक्षणाच्या, साहित्याच्या क्षेत्रांत हे नसतील असें मला एके काळीं वाटत होतें. ह्या बाबतींत माझी संपूर्ण निराशा झाली आहे. कांहीं मोठे मोठे प्राध्यापक व साहित्यिक दंभ आणि दिखाऊपणा ह्यांच्या चालत्या बोलत्या मूर्तिच वाटतात.

त्यांतही तत्त्वज्ञान शिकविणारे प्राध्यापक हे तर केवळ संधीसाधु बोक्यांप्रमाणेंच सामान्यतः असतात. केवळ बौद्धिक कसोटीनें सर्व गोष्टींकडे पाहाण्याची संवय झाल्यामुळें ते उपयुक्ततावादी किंवा संधीसाधु बनतात कीं काय नकळे. तत्त्वज्ञान आणि वेदान्त म्हटला की आपल्या मनांत पावित्र्य, मांगल्य, सत्य, सदाचार ह्यांच्या कल्पना घोळूं लागतात. आपल्या राष्ट्रांतील साधुसंतांनीं आणि ऋषीमुनींनीं तत्त्वचर्चा केल्याकारणानें कदाचित् आपणाला असें वाटत असेल. कारण कांहींही असो आपल्या मनांत तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक म्हटला कीं फार मोठ्या अपेक्षा निर्माण होतात. ह्याच्या उलट कांहीं प्रकार दिसला, की मला साहजिकच चीड येते.

आणखी चीड येते ती लोकांना फसविणाऱ्या व्यापाऱ्यांची. गेल्या कांहीं वर्षांपासून असल्या व्यापाऱ्यानी देशभक्तीचा व्यापार मांडून सामान्य जनतेलाच नव्हे तर प्रत्यक्ष सरकारला देखील पद्धतशीर रीतीनें नागविलें आहे. आपलीं पापें लपविण्याकरितां पूर्वी देवाला कांहीं व्यापारी सत्यनारायण करण्याचें आमिष दाखवीत असत. आताचे व्यापारी राष्ट्रीय फंडांना सढळ हातानें मदत करूं अशा वचनाचें आमिष राष्ट्रीय सरकारला दाखवीत असतात. दुधांत भेसळ, तुपांत भेसळ, धान्यांत भेसळ, औषधात भेसळ, अशा प्रकारें सर्व गोष्टींचें शुद्धत्व नाहीसें करणाऱ्या नरपशूंना पाहिलें कीं, कोणालाही चीडच आली पाहिजे. तुम्ही आम्ही सामान्य लोक गेल्या सहा-सात वर्षांत परिस्थितीच्या जात्यात अगदी भरडले गेलों आहोंत. ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं रोगप्रतिबंधक शक्ति आपल्या शरीरांतून अजिबात नाहींशी झाली आहे. ह्याच्या उलट काळाबाजारवाले व त्यांचे आप्तेष्ट ह्यांची स्थिति आहे. शरीरानें हे लोक चागलेच माजले आहेत. मनानें हे उन्मत्त बनले आहेत. पैशाच्या जोरावर ते काय वाटेल तें करूं शकतात. आपल्या राष्ट्रीय सरकारला ज्यांनीं फसविलें ते काय करायचें बाकी ठेवतील ? हिंदुस्थानाच्या उन्नतीच्या आड जर खरोखर कोणी येत असतील तर ते हे काळाबाजार चालू ठेवणारे व्यापारीच होत. ह्यांना पाहिलें कीं तुमच्याप्रमाणेंच मला देखील चीड येते. पण तुमच्या माझ्या चिडीनें ह्यांच्या नाकांतील बालही वांकडा होऊं शकत नाहीं. आपल्या सरकारला ह्याची चीड आली ( आणि ती लवकरच येईल ) तर मात्र ह्यांचें पुरते बारा वाजल्यावांचून राहणार नाहींत. माणसावर प्रेम करण्याऐवजीं, त्याला मदत करण्याऐवजीं, त्याची अप्रत्यक्ष रीतीनें हिंसा करणाऱ्या ह्या नराधम व्यापाऱ्यांना पाहिलें, कीं मला अगदीं भयंकर चीड येते.

# डामरी रस्ते

डामरी रस्ते, आधुनिक सुधारणेच्या अपत्याप्रमाणें शोभणारे डामरी रस्ते सामान्यतः कोणाचेंही लक्ष वेधतील, कोणालाही आवडतील असेच असतात. धूळ नाहीं, घाण नाहीं, उंचवटे किंवा खड्डे नाहींत असले रस्ते त्यांवरून चालणाऱ्याला कां बरें आवडणार नाहींत ! स्वच्छ, सरळ, तुकतुकीत डामरी रस्ते चालणाऱ्याला उत्तेजित करतात ह्यांत शंका नाही. विशेषतः सायकलवरून जातांना तर असल्या रस्त्यांवर आपण हवेंतून जणूं कांहीं विमानाप्रमाणें तरंगत आहोंत असेंच वाटतें. सायकल चालविण्याचे जरा देखील श्रम असल्या रस्त्यावर वाटत नाहीत. बर्फावरून स्केटिंग करणाऱ्याना जो आनंद वाटत असेल तो आनंद डामरी रस्त्यांवरून 'सायकलिंग' करणाऱ्यांना वाटतो. एकाच वेळीं पाण्यांत पोहण्याचा व हवेंत उडण्याचा लाभ अशा वेळीं सायकल चालवीत असतांना मिळतो. बडोद्यांतील डामरी सडकांवरून सायकल फिरवायला चटावलेल्या माझ्या पायांना ज्या वेळीं बडोद्याच्या बाहेर सायकल चालविण्याचा प्रसंग येतो, त्या वेळीं तो हाडें खिळखिळीं करणारा असाच वाटतो. दुधाचे चारचार डबे सायकलींना लावून खडकाळ रस्त्यांवरून येणाऱ्या दूधवाल्यांना पाहिलें कीं मला त्यांची दया येते !

अशा रीतीनें डामरी रस्ते चालणाऱ्याला सुखावह असतात ह्यांत फारशी शंका नाहीं. 'फारशी शंका नाहीं' म्हणण्याचें कारण उन्हाळ्यांत दुपारच्या वेळीं ह्या रस्त्याचें स्वरूप इतकें भयंकर बनते, कीं काहीं सांगण्याची सोय नाहीं. पादत्राण न घालतां अशा वेळीं डामरी रस्त्यांना पादस्पर्श करण्याची हिंमत करणें फारसें शहाणपणाचें नसतें. सकाळ-संध्याकाळ मुकाट्यानें स्वतःला तुडवून घेणारे हे रस्ते दुपारीं त्यांच्यावर पाऊल कांहीं ठेवूं देत नाहींत ! नातवंडांना एरवीं अंगाखांद्यावर लोळूं देणाऱ्या आजोबांनीं गायत्री जप करीत असतांना स्वतःला नातवंडांचा स्पर्शही करूं देऊं नये त्याप्रमाणें ह्या रस्त्यांचें दुपारीं असतें. न जाणो तेही त्या आजोबाप्रमाणें तपश्चर्या करीत असतील – नव्हे, ते तपश्चर्याच करीत असतात ! उन्हाळ्यांत सूर्यनारायणाकडे

पाहात पाहात ते तद्रूप बनतात. सूर्य त्याच्या हृदयात प्रकाशूं लागतो. अशा वेळीं डामरी रस्ते तपोनिधीप्रमाणें तेजःपुंज व प्रखर दिसतात. त्यांना त्या वेळीं दुरूनच पाहाण्यांत मौज असते. काहीं विलक्षण तऱ्हेनें ते त्या वेळीं चकाकत असतात.

आणि पावसाळ्यांत पाऊस पडत असतांना व पाऊस पडून गेल्यावर अशा दोन्ही वेळी देखील डामरी रस्ते फार सुंदर दिसतात. पावसाचे थेंब नर्तिके-प्रमाणे नाचत असलेले दिसतात. पाऊस पडून गेल्यावर डामरी रस्ता एकाद्या नीग्रोनें स्नान केल्यावर तो जसा दिसेल तसा दिसतो. त्या वेळीं त्याच्या काळ्या देहावरील तकाकी मोठी विलोभनीय वाटते. कित्येक वेळां रस्त्याच्या कडेनें खोलगट जागीं पाणी सांचतें. आणि मग तें बिलोरी आरशाप्रमाणें बहारीचें दिसतें. विशेषतः त्यात जाणाऱ्यायेणाऱ्यांचीं प्रतिबिंबें जीं दिसतात तीं तर विलक्षण मोहक असतात.

असें असलें तरी डामरी रस्त्यापेक्षां साध्या रस्त्याचे आणि त्याहीपेक्षां पाऊलवाटेचेंच मला विशेष आकर्षण वाटतें. माझ्या साप्ताहिक भटकन्तींत बडोद्याच्या बाहेर पडून साध्या रस्त्यांनी किंवा पाऊलवाटांनीं मी ज्या वेळीं फिरायला निघतों, त्या वेळीं जिवलग मित्रांशीं गुजगोष्टी केल्याचें समाधान मला लाभतें. माझ्या अगोदर कोण कोण येऊन गेले त्याची सर्व बातमी मला लागते. गाईम्हशीचे खूर, शेळयामेंढराचे खूर, घोड्याच्या टापा, मोरांचे पंजे, माणसांची निरनिराळ्या आकाराचीं पावलें ही सर्व रस्त्यांत स्वच्छ दिसतात. मनुष्यावर अगणित उपकार करणाऱ्या प्राण्यांचीं पावलें धुळींत रेखाटलेली पाहिलीं की काहीं अननुभूत भावनांनीं माझें हृदय भरून येतें. मनुष्याची अक्षरशः मूकसेवा करणाऱ्या ह्या जीवांचें भलें होवो, असें मी मनांतल्या मनांत इच्छितों.

एकदां असाच चालत असताना, माझ्यासमोर शेळयाचे छोटे छोटे खूर धुळींत मला दिसले. त्यांचा मागोवा घेत घेत मी कांहीं अंतर चालून गेलों तों तेथें शेळयांचा कळप मला दिसला. ह्या कळपांतील सर्व शेळयांचें तोंड आलें असल्यानें त्या बेचैन दिसत होत्या. त्याचीं तोंडें लाल व सुजलेलीं दिसत होतीं.

कांहींच्या तोंडांवर फोड देखील होते. तेवढ्यांत डोक्याला लाल मुंडासें बांधलेला एक धनगर तेथें आला. त्याच्या हातांत तेलाची करवंटी होती; ती पाहातांच शेळया त्याच्या भोवतीं जमा झाल्या. त्यानें नंतर करवंटींतील तेलांत आपलीं बोटें बुडवून प्रत्येक शेळीच्या तोंडाला आंतून तेल लावलें. शेळया मुकाट्यानें तेल लावून घेत होत्या त्या अर्थी त्यांना त्यापासून सुख होत असावें हें नक्की. ‘पावसाळ्यांत वाटेल तो पाला खाल्ल्याचा हा परिणाम,’ असें धनगरानें मला सांगितलें. तरी देखील त्या शेळ्यांविषयीं मला पराकाष्ठेचें दुःख वाटूं लागलें. तेव्हांपासून शेळ्याचे खूर दिसतांच मला त्या रोगानें पीडलेल्या शेळ्यांची आठवण होते.

लहान मुलाची पावले दिसताच माझें अंतःकरण दया, दुःख, उद्वेग, सहानुभूति अशा संमिश्र भावनांनी भरून जातें. ह्याचें कारण असें झालें: एकदां वाटेंत लहान मुलाचीं पावलें धुळींत उमटलेलीं मला दिसलीं. तीं छोटीं पावलें पाहाताच वात्सल्यानें माझें हृदय भरून आलें. ‘रम्य तें बालपण’ इत्यादि काव्यपंक्तीही मला आठवल्या. लहानपण किती छान असतें, किती निष्पाप असतें! किती विलोभनीय असतें! लहान मुलें, गोजिरीसाजिरी मुलें. देवाघरींच्या फुलाप्रमाणें शोभणारीं लहान मुलें मला आठवली. आणि एक प्रकारच्या सुखद काव्यमय वृत्तीनें मी त्या गोजिरवाण्या पदकमलांच्या मागेंमागें जाऊं लागलों. काही वेळ चालून गेल्यावर माझ्या कानांवर रडण्याचा स्वर आला. आणखी काही वेळानें चार-पांच वर्षांचा एक मुलगा‘ ओमा ओमा ’ करीत, रडत रडत कष्टानें चालत असलेला मला दिसला. त्या मुलाच्या पुढें पंधरा-वीस पावलावर एक बाई डोक्यावर बोजा, हातांत बोजा व कमरेवर मूल अशी चालत असलेली मला दिसली. ती त्या मुलाची आईच असावी. मुलाचें रडणें न ऐकवून मीं त्या बाईला मोठ्यानें हांक मारली व म्हणालों, “मुलगा रडतो आहे; त्याला चालवत नाहीं. जरा हळू चाल.” माझी हांक ऐकताच ती बाई थांबली. तिचा चेहेरा दुःखीकष्टी दिसत होता. ती थांबताच मी पुन्हा म्हणालों, “मुलगा किती लहान आहे! तो थकून गेला आहे, तूं जरा हळू चाल.”

“हळू चालून कसं भागेल? अजून कितीतरी लांब जायचंय्!”

पंचवीस वर्षांनंतर

" कुठं जायचंय् ? " मी विचारलें. त्यावर तीन मैल दूर असलेली शहरातील जागा तिनें सांगितली. मी म्हणालों, " हा मुलगा इतकं चालणं शक्य नाहीं; तो रस्त्यात पडून जाईल."

" जाईल मेला पडून ! " उद्वेगानें ती स्त्री म्हणाली, " मी सुटेन त्याच्या त्रासांतून."

" असं का म्हणतेस ? किती चांगला आहे मुलगा ! " मी म्हणालों.

" माझे म्हातारे वडील जिन्यावरून पडल्यानें त्याची कंबर मोडल्याची बातमी मला कळली आहे. त्यांना भेटायला मी शहरात चाललें आहें. ह्या मुलाला सासूजवळ ठेवायचं मी म्हणत होतें; पण सासूने कानावर हात ठेवले. ' तुझीं मुलं तूं सांभाळ ' म्हणाली. घरधन्यांना सांगून पाहिलं. तेही तेंच म्हणाले. मग मी काय करणार ? " ती म्हणाली.

" स्टेशन आतां जवळ आलं आहे; स्टेशनावरून गावांत जायला मोटार मिळेल. " काय बोलावें तें धड न सुचल्यानें कष्टी स्वरात मी म्हणालों.

" पण माझ्याजवळ पैसे कुठें आहेत ? "

हें तिचें उत्तर ऐकून मला अत्यंत वाईट वाटलें. माझ्या खिशात चार आणे होते. ते तिच्या मुलाच्या हातांत ठेवींत मी म्हणालों, " आतां स्टेशनावरून मोटारमधें बसून गावात जा हं ! " तिच्या डोळयात आसवें चमकूं लागलीं. तीं पाहून मी म्हणालों, " मी मुलाला खाऊ दिला आहे. मुलगा किती गोजिरवाणा आहे ! बापडा थकून गेला आहे. थोडा वेळ तुम्हांला बसायलाही हरकत नाही. " बाई तत्क्षणींच खालीं बसली व त्या थकलेल्या मुलाला जवळ घेऊन तिनें कुरवाळलें. तें दृश्य पाहून माझ्याही डोळयांत अश्रु आले व मी पुढें चालूं लागलों.

त्या प्रसंगानंतर जेव्हां जेव्हां रस्त्यांत लहान मुलांचीं पावलें मला दिसतात तेव्हां तेव्हां मला हा प्रसंग आठवतो. खरंच, मुलें किती असाहाय्य असतात लहानपणीं ! त्यांचा भरिभार सर्व आईबापांवर. आईबापांनीं नीट वागविलें किंवा नीट वागविण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं असलें तर सर्व ठीक. नाहींतर

मोठें होण्याचे किती कष्ट ! कसलें आलें आहे 'रम्य तें बालपण !' 'दुःखी तें बालपण, कठिण तें बालपण' असेंच म्हटलें पाहिजे.

साध्या रस्त्यावर चालणाऱ्यांचीं पावलें उमटतात आणि मागाहून येणाऱ्याला त्यांचा मागोवा घेतां येतो. पावलांवर पाऊल टाकण्याचें समाधान ह्याच रस्त्यावर मिळूं शकतें. डामरी रस्त्यावर पावलें कोणाचीं उमटायला नकोत आणि मार्गदर्शन कोणाला व्हायला नको. व्यक्तिस्वातंत्र्याच्या आणि लोकशाहीच्या सध्याच्या काळांत कोणाचें कोणी अनुकरण नको करायला. साधे रस्ते सज्जनांच्या हृदयाप्रमाणें परिणामक्षम, भावक्षम असतात. त्याच्या उलट मुत्सद्दी लोकांच्या हृदयाप्रमाणें डामरी रस्ते असतात. साधे मातीचे रस्ते मृदुमृदुल असतात. दुपारखेरीज कोणत्याही वेळीं त्यांवरून चालत असताना आपण मखमलीच्या गालीच्यावरून चालत आहोंत असें आपणांला वाटतें; आपल्या पायाना आंजरल्यागोंजरल्यासारखें आपणाला वाटतें. लहान मुलांना असल्या रस्त्यांवर खेळायला आवडतें तें ह्याचमुळें. जणूं काय भूमाताच त्यांना आपल्या वक्षःस्थळावर खेळवीत आहेसें त्यांना वाटतें. गेल्या वर्षी आम्हीं बडोद्याहून डाकोरला पायीं चालत गेलो. त्या वेळीं चालून चालून आमचे पाय इतके हुळहुळे झाले, कीं कांहीं पुसूं नका. विश्रांतीची जागा येतांच आम्ही आमचे पाय गारगार मातींत खुपसले. त्याबरोबर आमचा शीणभाग तावडतोब नाहींसा झाला. आम्ही थकलेलीं लेकरें होतों. पृथ्वीमाताच जणूं काय आमचे पाय चेपीत होती असें आम्हांला वाटलें.

असलें सुख डामरी रस्त्यावर कुठलें मिळायला ? डामरी रस्ते आपल्या पावलांचा स्वीकार करण्याऐवजीं ताठरपणें प्रतिकार करीत असल्यासारखे दिसतात. भावशून्य डामरी रस्ते मला आवडत नाहींत ते ह्याचमुळें. छे ! छे ! गाड्या, मोटारी अशांसारख्या निर्जीव यंत्रांकरितां डामरी सडका ठीक असल्या तरी सजीव माणसांकरितां त्या कांहीं चांगल्या नाहींत हेंच खरें.